


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# भाषा आणि जीवन



**मराठी-अभ्यास-परिषद्-पत्रिका**

वर्ष १ अंक १

जुलै १९८३

अनुक्रमणिका

## अनुक्रम



---

संपादक : अशोक रा. केळकर
इतर संपादन-समिती-सदस्य : कल्याण काळे, अंजली सोमण, प्रभाकर नारायण परांजपे, मॅक्सीन बर्न्‌सन
संपादकीय पत्रव्यवहार व परीक्षणार्थ ग्रंथ : ए–२ परिमल, १२३९–ए आपटे रस्ता, पुणे ४११००४
इतर सर्व पत्रव्यवहार : चिटणीस, मराठी-अभ्यास-परिषद्, १/८ आगरकरनगर, पुणे ४११००१
वार्षिक वर्गणी : परिषदेच्या साधारण सभासदांनी १५ रु. वेगळे द्यावे. आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना वेगळी नाही. संस्थांना आणि परिषदेचे सभासद नसणाऱ्या व्यक्तींना ४० रु., या अंकाला १० रु. (शिवाय पान ३२–३३ पहा.)

संपादकीय

# भाषा आणि जीवन

ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलात वाणीला उद्देशून एक ऋचा आहे ( १० : ७१ : ४)

उत त्वः पश्यन्न ददर्श वाचम् उत त्वः शृण्वन्न शृणोत्येनाम्

उतो त्वस्मै तन्वं विसस्रे जायेव पत्य उशती सुवासाः

( अर्थ : तो वाणीला पाहतो पण पाहतच नाही, तो तिला ऐकतो पण ऐकतच नाही, पण त्याच्यापुढे वाणी आपल्याला संपूर्ण प्रकट करते, जशी उत्तम वस्त्र ल्यालेली पत्नी पतीच्यापुढे. ) मूळ कवीला वाणीच्या गूढ स्वरूपाविषयी ह्यातून काही सूचित करायचे असावे. पण मला मात्र तुमच्याआमच्या प्रकट वाणीच्या अभ्यासकाला सुद्धा यातून काही सूचित होते असे वाटते. भाषेचा अभ्यासक तिच्या व्याकरणाचे नियम शोधून काढायचे म्हणतो, तिच्या उच्चारणाचे बारकावे जाणून घ्यावे म्हणतो, अर्थांगाचा कीस पाडायला बघतो, पण जोपर्यंत तो तिच्यावर प्रेम करीत नाही तोपर्यंत ती त्याच्या अधीन होत नाही, आपले सगळे गुपित त्याला सांगत नाही. आणि भाषेवर प्रेम करायचे तर तिला ती ज्या भाषाव्यवहारात परिणत होते आणि ज्या भाषाव्यवहारातूनच जन्म घेते त्या भाषाव्यवहारात, संपूर्ण जीवनाच्या संदर्भातच पाहता आले पाहिजे. भाषेत जीवन ओतप्रोत भरलेले आहे. किती ते परभाषीयाच्या चष्म्यातून आपल्या भाषेकडे पाहू लागले की तेव्हाच जाणवते.

पण भाषा आणि जीवन यांचे हे अतूट नाते इथेच संपत नाही. भाषेत जीवन काठोकाठ भरलेले असले तर भाषाही जीवनात शिगोशीग भरून राहिलेली आहे. कसे ते पाहा. पांढरपेशा मुलाची पाण्याशी ओळख होते आणि दलित मुलाची पाण्याशी काही निराळी ओळख होते—‘ पाणी ’ हा एकच शब्द त्यांना काहीशा वेगळ्या जीवनभरल्या अर्थांची ओळख त्यामुळे पटवतो. जीवन भाषेला व्यापते ते असे. आता ओतप्रोत, काठोकाठ, शिगोशीग हे तीन काहीशा समान अर्थांचे पण वेगळ्या प्रतिमा घेऊन येणारे शब्द पहा. ( प्रतिमा अनुक्रमे उभेआडवे विणलेले धागे, पाण्याने भरलेले भांडे, धान्याने भरलेले माप ). या प्रतिमा इंग्रजीलाही ठाऊक आहेत. : warp aud woof, full to the brim, पण या इंग्रजी शब्दांनी आपले समाधान होत नाही, अधिकपणा सुचवण्यासाठी रूपाची पुनरुक्ती साधण्याची खास भारतीय लकब त्या शब्दांत नाही. ( उगीच नाही इंग्रजी बोलताना भारतीय माणसाला same to same, little little knowledge असे इंग्रजीला ठाऊक नसणारे प्रयोग करावे लागत ! ) जीवनाचा अनुभव घेण्याची ज्याची त्याची लकबच अखेर एक भाषिक लकब असते. भाषा जीवनाला व्यापते ती अशी.

कधीकधी या लकबीचा वैताग येतो हे मात्र खरे. ‘ भाषेत जीवन काठोकाठ भरलेले असले तर भाषाही जीवनात शिगोशीग भरून राहिलेली आहे ’ हे माझे वाक्य ऐकल्यावर तुम्ही मनात तडफडला असाल ( वैताग ! लागला हा माणूस भाषिक कोलांट्या मारायला ). एव्हाना तो वैताग निमाला असेल असे वाटावे.

**अशोक रा. केळकर**

# परभाषीयांना मराठी साहित्य शिकवताना येणारे अनुभव

## सुमन बेलवलकर

भारतातल्या निरनिराळ्या प्रांतांतले शिक्षक मराठी शिकण्यासाठी दरवर्षी जुलै महिन्यात पुण्याच्या डेक्कन कॉलेजमधल्या पश्चिम विभागीय भाषाकेंद्रात येतात. हे सर्व प्रशिक्षित माध्यमिक शिक्षक असतात. त्यांचा वयोगट २५ ते ३५ वर्षांच्या असतो. या शिक्षकांमध्ये सर्व आपापल्या शाळेत भाषाविषय शिकवणारेच असतात असे नाही. विज्ञान, इतिहास-भूगोल, गणित यांसारखे इतर विषय शिकवणारे अधिक. क्वचित एखादा शारीरिक शिक्षण देणाराही असतो. त्यांच्यामधे पदवीपरीक्षेपर्यंत भाषाविषय (अभ्यास साहित्याचा) असणारेच असले पाहिजेत हीही अट नसते. असा हा वेग-वेगळ्या मातृभाषा बोलणाऱ्या आणि शैक्षणिक, सामाजिक, आर्थिक सर्वच बाबतींत भिन्न पार्श्वभूमी असणाऱ्या लोकांचा मिश्र गट असतो. जुलै ते एप्रिल अखेर दहा महिन्यांमधे ते मराठी भाषा शिकतात. साध्या मराठी वाक्यरचनेपासून सुरुवात करून ते मराठी साहित्य वाचणे, त्याचा आस्वाद घेणे इथवर मजल मारतात. (मराठीखेरीज गुजराती आणि सिंधी भाषा शिकवण्याची सोयही या केंद्रात आहे.)

या वेगळ्या अभ्यासक्रमाशी माझा परिचय थोडा उशिराच झाला. दहा वर्षे महाविद्यालयीन वर्गांना मराठी साहित्य शिकवून मग मी या नव्या रुळावर आले. मी रुजू झाले ती मार्च महिन्यात. तेव्हा वर्गात 'जन पळभर म्हणतील हाय हाय' गाणारे–(फारतर चालीला आसामी विद्यार्थ्याने लावलेले थोडेसे आसामी वळण आणि उच्चारांमधला थोडा वेगळेपणा) आणि 'हिमालयाची सावली' मधल्या 'बयो'वर तीनचार पानं लिहिणारे, चर्चा करणारे विद्यार्थी पाहून मला आश्चर्यच वाटलं होतं. नंतर अभ्यासक्रमाची चक्रं पूर्ण केल्यानंतर स्वतःच्या आणि सहकाऱ्यांच्या अनुभवातून परभाषीयांना मराठी साहित्य शिकवताना आलेल्या अनुभवामुळे आपल्याच साहित्या-कडे पाहाण्याची एक वेगळी दृष्टी आली. आपलं घर आपण घरात उभे राहून पाहातो आणि ते दुसऱ्या कोणाच्या तरी गच्चीतून पाहातो तसा काहीसा हा अनुभव होता.

एक गोष्ट खरीच, की भाषा शिकायला येणाऱ्या विद्यार्थ्यांना आकर्षण असते ते साहित्याचे. अगदी आसामच्या टोकापासून येणाऱ्यालाही तुकाराम, ज्ञानेश्वरांचे नाव कानावर पडलेले असते. अंदमानहून आलेल्या एका विद्यार्थ्याला सावरकरांचे साहित्य

या भाषेत आहे म्हणून ही भाषा शिकायची होती. तमिळ विद्यार्थ्यांनी तमिळ भाषेत भाषांतरित झालेली खांडेकरांची पुस्तकं वाचलेली होती आणि त्या ओढीने ते ही भाषा शिकायला आले होते. गुजराती किंवा सिंधी या भाषा शिकायला केंद्रात येणाऱ्यांमध्ये त्या भाषांचा व्यापारात संबंध येतो म्हणून भाषा शिकावी या हेतूने येणारे विद्यार्थीही होते. मराठीच्या बाबतीत मात्र हा हेतू घेऊन येणारा एकही विद्यार्थी नव्हता. सर्वांनाच साहित्याचं प्रेम इतकं उत्कट असतं अशातला भाग नाही. पण स्वतःचं घर बांधल्यावर समोरच्या मोकळ्या जागेत थोडंफार बागकाम करणारा प्रत्येकजण वनस्पतीशास्त्राचं ज्ञान आणि प्रेम असणारा थोडाच असतो ! भाषा एकदा हातात आल्यावर हे विद्यार्थीही साहित्यापासून दूर राहात नाहीत.

भाषा शिक्षणाचा हा अभ्यासक्रम प्राथमिक, माध्यमिक, आणि प्रगत अशा तीन टप्प्यांमधे विभागलेला असतो. प्राथमिक टप्प्यात त्यांना मराठीतल्या प्रमुख वाक्य-रचना शिकवल्या जातात. हा घटवून घेण्याचा काळ कंटाळवाणा असतो. या वेळी साहित्याचा वापर थोडासा साधनात्मक रीतीनी आम्ही करतो. कंटाळा घालवावा आणि नवी वाक्यरचना तोंडात बसावी म्हणून कवितेला आम्ही हाताशी धरतो. बदलणारी विशेषणं शिकवताना 'गोरी गोरी पान', वर्तमानकाळ शिकवताना 'आंबा पिकतो रस गळतो' सारख्या दोन ओळी, भविष्यकाळ शिकवताना 'सांग सांग भोलानाथ पाऊस पडेल काय ?' किंवा जर–तर शिकवताना शांता शेळक्यांची 'जर मी झालो राजा...' यांचा चांगला उपयोग होतो. अर्थात हे साहित्य शिकवणे नाही. पण साहित्याची अशीही मदत होते. विद्यार्थ्यांचा हुरूप वाढतो.

माध्यमिक टप्प्यावर विद्यार्थ्यांना मराठी समाज, संस्कृती, आचारविचार यांची ओळख करून देणं महत्त्वाचं असतं. पंधरा दिवसांसाठी हे विद्यार्थी पर्यावरण सहलीला महाराष्ट्रातल्या दोन गावांना भेट देतात—आसपासची ठिकाणं पाहातात. तिथे समाजात मिसळता यावं यासाठी तयारी म्हणून ही सांस्कृतिक ओळख असते. त्या काळात साहित्याचा एकदा असाच अनपेक्षित सुखद अनुभव आला होता. 'भरात' या शब्दाचा अर्थ सांगायचा होता. खुलासे, स्पष्टीकरणं करत असतानाच महानोरांच्या चार ओळी डोळ्यांसमोर आल्या—

डोळे थकून थकून गेले
पाखरागत येऊन जा
रान भल्तंच भरात
पिकात धुडगूस घालून जा.

अर्थ उमगल्याची खूण विद्यार्थ्यांच्या चमकणाऱ्या डोळ्यांत दिसली. तिथं माझ्याही लक्षात आलं—कवितेतल्या शब्दांमधले अर्थ आणि भाषेतले नेहमीचे अर्थ यात सामर्थ्याचा किती फरक आहे ! हवेवर वाहात येणारा सुगंध आणि कुपीतल्या अत्तरात कोंडलेला सुगंधाचा अर्क असा तो फरक असतो. साहित्यातल्या शब्दांचे अर्थ असे

अत्तरासारखे दरवळत असतात. घेणाऱ्याला विनासायास घेता येतात. एक पत्र शिकवतानाही सहज माधव जूलियनांच्या

सुखरूप आहे ना ग
माझ्या चिमण्यांची आई
जिऱ्या जिवावर राही
विसंबून मी...

या ओळी वर्गात सांगितल्या. विद्यार्थ्यांना त्यातली कल्पना, साधेपणा फार आवडला. ताबडतोब काहींनी आपापल्या घरी पत्र लिहिताना त्या ओळींचा (स्वतःच्या भाषेत) उपयोग केला होता. मराठी संस्कृतीची ओळख करून देताना अशी अधून मधून साहित्याचीही ओळख करून दिली जाते. माध्यमिक अभ्यासक्रमाच्या काळातच हे विद्यार्थी सहलीला जातात. सहलीच्या ठिकाणांमध्ये औरंगाबाद अनेकदा घेतलं जातं. मराठवाडा विद्यापीठाच्या मराठी विभागात विद्यार्थ्यांना महानुभावांच्या पोथ्या, वस्तूंचा संग्रह पाहायला मिळतो. पूर्वतयारीसाठी म्हणूनच त्यांना महानुभाव पंथाची माहिती द्यावी लागते. महानुभाव साहित्यातल्या दृष्टांतपाठाची उदाहरणं या विद्यार्थ्यांना फार आवडतात. एका आसामी विद्यार्थ्याने आवर्जून दृष्टांतपाठ खरेदी केला होता.

या विद्यार्थ्यांच्या अभ्यासात साहित्य खऱ्या अर्थानी येतं ते प्रगत अभ्यासक्रमात फेब्रुवारी ते एप्रिलअखेर या बारा आठवड्यांमधे. त्यांना एक पुस्तक स्थूल वाचनासाठी असते. दुसरा डॉ. विजया चिटणीस यांनी संकलित केलेला गद्य-पद्य उताऱ्यांचा एक संग्रह असतो. मराठी साहित्याचा धावता इतिहासही शिकवण्यात येतो. या साहित्याची निवड करताना बऱ्याच गोष्टींचे अवधान ठेवावे लागते. आणि निवडलेल्या उताऱ्यांना मिळणाऱ्या प्रतिसादानुरूप काही बदल आणि प्रयोगही करावे लागतात.

स्थूल वाचनाबद्दल बोलायचं तर एखाद्या आधुनिक लेखकाचा कथासंग्रह, कादंबरी किंवा नाटक आम्ही निवडतो. एका वर्षी 'हिमालयांची सावली' हे नाटक शिकवलं होतं. बयोची व्यक्तिरेखा त्यांना खूप आवडली होती. एका विद्यार्थ्याने आपल्या म्हाताऱ्या आईला पत्र लिहिलं होतं—'अगदी तुझ्यासारखीच आम्ही शिकत असलेल्या नाटकाची नायिका आहे.' नानासाहेब भानूंची वाक्यं त्यांना तोंडपाठ असत. इतकी की 'कडोसरी' हा शब्दही कुठे भाषांतर करताना त्यांना चटकन आठवे. व्यंकटेश माडगूळकरांच्या 'गावाकडच्या गोष्टी' आणि 'गोष्टी घराकडील' या पुस्तकांनाही फार चांगला प्रतिसाद होता. विशेषतः माडगूळकरांच्या लेखनाला आपण प्रादेशिक म्हणतो, त्या व्यक्ती विशिष्ट भागातल्या आहेत असं म्हणतो; पण या विद्यार्थ्यांना मात्र अशी सर्व माणसं आमच्याकडेही आहेत असं वाटायचं. गेली दोन वर्षे आम्ही भाषांतराचा एक वेगळा प्रकल्प हातात घेतला होता. या स्थूल वाचनाच्या पुस्तकातील कथांचें स्वभाषेत भाषांतर करणे हा तो प्रयोग. ही भाषांतरं त्या त्या भाषेचे विद्यार्थी चर्चा करून तपासत. भाषांतर करताना माडगूळकरांच्या ग्रामीण

भाषेचे भाषांतर करणे त्यांना सोपे जाई; कारण ते स्वतः ग्रामीण भागातूनच आलेले शिक्षक असतात. सासूसुनेची कथेतली भांडणं वगैरे ते अगदी अचूक शब्द वापरून आपल्या भाषेत लिहीत.

या पुस्तकांच्या वाचनातून त्यांची महाराष्ट्राबद्दल काही मतेही बनत. 'हिमालयाची सावली'मधल्या नानासाहेबांबद्दल त्यांना नवल वाटे. आधी नाना आपल्या मुलाला म्हणतात, "पुरुषोत्तमा, बारा वाजून गेले. तार आली नाही त्याअर्थी तू नापास झालास." इ. आणि पुढे त्याला गोल्डमेडल मिळाले आहे हे कळल्यावरही, "तू वीस वर्षांचा होईपर्यंतच तुझ्या शिक्षणाची जबाबदारी माझ्यावर होती", हा आपला पहिलाच मुद्दा ते सांगतात. हा बाप विद्यार्थ्यांना खास महाराष्ट्रातला वाटत असे. माडगूळकरांच्या 'पाणी' कथेसंबंधी बोलताना एक विद्यार्थी म्हणाला, "महाराष्ट्रात मानाला फार मान आहे." 'मराठी माणसं स्वाभिमानाला फार जपतात' असा त्याचा अभिप्राय होता. प्रसंगी त्यांच्या मतांचाही शिकवण्यावर परिणाम होतो. ज्या भागातून ते येतात तिकडे स्त्रीस्वातंत्र्य, समान हक्क इ. जाणिवा महाराष्ट्राइतक्या, विशेषतः पुण्यामुंबईसारख्या शहरांइतक्या पुढारलेल्या नाहीत. नीतिअनीतीच्या त्यांच्या कल्पना पक्क्या असतात. त्यामुळे पूर्वी एका अध्यापिकेने 'शांतता ! कोर्ट चालू आहे' शिकवण्याचा प्रयत्न केला तेव्हा नायिकेविषयी सहानुभूती निर्माण करण्यात तिला पूर्ण अपयश आले होते. ज्यांच्या बायका अजून गोषात वावरतात, घरी आलेल्या परक्या माणसांशी बोलतही नाहीत अशांच्या हा घास गळी उतरवणे कुवतीबाहेरचे काम होते. त्यांना बसणारे सांस्कृतिक धक्के या बाबतीत अति शक्तिशाली व्होल्टेजचे ठरतात.

सूक्ष्म अभ्यासासाठी त्यांना गद्य-पद्य वेचे निवडताना अनेक गोष्टींचा विचार करावा लागतो. भाषेचे रूप परिचित असावे आणि सांस्कृतिक संदर्भ फार जुने झालेले नसावेत या दृष्टींनी बहुतेक उतारे आधुनिक साहित्यातलेच असतात. त्यांत नामवंत साहित्यिकांचा समावेश करावा लागतोच. पण त्या साहित्यिकाचा कोणता उतारा भाषेच्या दृष्टीने पचनी पडेल याचा विचार प्रथम करावा लागतो. त्यामुळे खांडेकर, गडकरी घेता येत नाहीत आणि जी. ए. कुलकर्णीही वगळावे लागतात. एकाच लेखकाची भाषाशैली साहित्यप्रकारानुसार बदलते. अशावेळी भाषेच्या सोपेपणाकडेच कौल द्यावा लागतो. पु. ल. देशपांडे यांच्या 'बटाट्याची चाळ', 'व्यक्ती आणि वल्ली' यामधल्या विनोदी लेखनशैलीत परभाषीयांना फार अडचणी येतात. एकूणच समजण्याच्या दृष्टीने परभाषेतले विनोदी साहित्य सर्वांत कठीण जाते. कारण त्यातले संकेत, श्लेष, व्यक्तिवर्णन साऱ्यांचे संदर्भ त्या त्या भाषिक समाजाच्या जीवनातच बांधलेले असतात. खुलासा करून ते समजण्यासारखे नसतात आणि 'अर्थ स्पष्ट करून' सांगावा लागला तर विनोदात काय उरले ? यासाठी पु. लं. चा विनोदी उतारा न घेता 'सुंदर मी होणार' या नाटकातला उतारा निवडला. तीच गोष्ट अत्र्यांची. हुंड्याच्या सार्वत्रिक समस्येवरचा 'तो मी नव्हेच' मधला भाग निवडून

अत्र्यांच्या ‘ खऱ्या ’ साहित्याला तसं दूरच ठेवणं भाग पडतं. मंगेश पाडगावकरांच्या ‘ वात्रटिका ’ वाचून दाखवत असताना शाळेच्या संदर्भातल्या ज्या वात्रटिका होत्या त्यांच्याबाबतीत ही अडचण आली नाही, कारण ते संदर्भ त्यांच्या परिचयाचे होते.

साहित्यातला कोणता भाग निवडायचा हे ठरवताना दोन निकष आम्ही साधारणपणे डोळ्यांसमोर ठेवतो. पहिला—ज्यामधे सार्वकालिक, सर्वांनाच आपलेसे वाटणारे अनुभव आहेत असे. उदा०– ‘ जन पळभर म्हणतील हाय हाय ’ ही कविता सर्वांनाच फार भिडते. आसामी विद्यार्थ्यांना तर त्यांच्या भाषेतली अगदी तशीच कविता आठवते आणि इतक्या दूरच्या प्रांतातल्या प्रतिभावंतांच्या या साम्यामुळे ते सुखावतात. अर्थात या निकषावर जर ज्ञानेश्वरांचे ‘ पसायदान ’ शिकवले तर त्यातल्या प्रार्थना सगळ्याच संतमहात्म्यांनी केलेल्या असल्यामुळे विद्यार्थ्यांना त्यात काही नवीन वाटत नाही. त्यांना ‘ पसायदाना ’पेक्षा ‘ श्रोत्यांना विनवणी ’ जास्त आवडते. केशवसुतांच्या ‘ नवा शिपाई ’ पेक्षा ‘ सतारीचे बोल ’ ही कविता त्यांना अधिक बांधून ठेवते. यावरून एक लक्षात येईल की लेखकाचे सर्वोत्कृष्ट लेखन किंवा मराठी लोकांमधे सर्वांत लोकप्रिय असलेलेच लेखन या विद्यार्थ्यांसाठी निवडता येत नाही.

दुसरा निकष, आपल्या साहित्यातले खास, वेगळे काहीतरी या विद्यार्थ्यांना देणे हा. इथेसुद्धा काही अंदाज फसतात. सुरेश भट यांची ‘ उषःकाल होता होता काळरात्र झाली ’ ही कविता नव्या अनुभवासाठी निवडली तर स्वातंत्र्योत्तर काळातल्या वैफल्यावर पुष्कळ साहित्य बंगालीत झाले आहे म्हणून बंगाली विद्यार्थ्यांना त्या कवितेचे विशेष अप्रूप वाटले नाही. यावर्षीच घेतलेल्या महानोरांच्या ‘ या नभाने या भुईला दान द्यावे ’ या कवितेपेक्षा बहिणाबाईंच्या ‘ संसारा ’च्या ओव्या विद्यार्थ्यांना अधिक आवडल्या.

इथेही जो अनुभव स्त्रीस्वातंत्र्याचे विचार मांडणाऱ्या मजकुराबद्दल येतो तो, दलित साहित्याबद्दल येत नाही हे विशेष सांगण्यासारखे. ‘ उपरा ’ आणि ‘ बलुतं ’ मधले उतारे लेखकांच्या पार्श्वभूमीसह शिकवताना या भाषेने हे काहीतरी फार पुढे जाऊन मिळवलेले आहे अशी भावना विद्यार्थ्यांच्या मनात जागी होते. माध्यमिक अभ्यासक्रमापासूनच दलित साहित्याबद्दलचे कुतूहल त्यांच्या मनात निर्माण होते. जसे सहलीत आसामच्या विद्यार्थ्यांना आसाम आंदोलनाविषयी प्रश्न विचारलेच जातात तसे हे विद्यार्थी साहित्यिकांना, साहित्यिक चर्चेत आधी दलित साहित्याबद्दल विचारतात. औरंगाबादला विद्यापीठाच्या मराठी विभागात डॉ. गंगाधर पानतावणे यांनी दलित साहित्याची माहिती दिली होती. त्यांनी असं सांगितलं होतं, की उच्चवर्णीयांच्या लेखनात दलितांचे वर्णन येई; पण त्या जीवनाचा कसलाच अनुभव नसल्यामुळे ते चित्र खोटं, विपर्यस्त असे. भाषणानंतर एका विद्यार्थ्याने त्यांना प्रश्न विचारला, “ सवर्ण तुमच्या जीवनाचं चित्र चुकीचं रंगवत हे ठीक आहे. आता दलित जेव्हा सवर्णांच्या जीवनाचं चित्र त्यांच्या साहित्यात रंगवतात तेव्हा ते कसं असतं ? ” यावरून एकच स्पष्ट होते की दलितांचे साहित्य ही त्यांना नवी गोष्ट आहे, दलित





अनुक्रमणिका

नाहीत. म्हणूनच स्त्रीस्वातंत्र्यवादी साहित्यापेक्षा याला वेगळा प्रतिसाद मिळतो.

साहित्याच्या अभ्यासाच्या या काळात विद्यार्थी आवडीने वाचायला लागतात. माडगूळकरांची जवळजवळ सर्व पुस्तकं वाचणारे विद्यार्थी दरवर्षी निघतात. माडगूळकरांच्या भाषेतल्या चित्रमयतेची त्यांना मोठीच मदत होते. त्यांच्या वाचनात नाटकांचं प्रमाणही जास्त असतं. यावर्षी ' पुरुष ', ' संध्याछाया ' पाहून त्यांची अतिशय प्रशंसा करणारे विद्यार्थी होते. प्रगत रंगभूमी ही त्यांना नवलाईची वाटणारी गोष्ट. त्यामुळे काही विद्यार्थी तर शक्य होतील तितकी नाटकं पाहून, वाचून घेतात. परत गेल्यावर नाटकांचं भाषांतर करावं अशी त्यांची इच्छा असते. गेल्या वर्षी एका हिंदी भाषी विद्यार्थ्यानी श्री. ना. पेंडसे यांची ' ऑक्टोपस ' ही कादंबरी वाचली. " लेखकाने प्रत्येक माणसाला अगदी मायक्रोस्कोपखाली धरले आहे. " अशा शब्दांत कादंबरीची प्रशंसा करताना " इतका धीटपणा आमचे लेखक दाखवू शकणार नाहीत, " असंही त्यांनी कबूल केलं होतं. काही वेळा वाचलेल्या पुस्तकातल्या ते शंका विचारतात, त्याही बोलक्या असतात. वाङ्मयाचा इतिहास वाचणाऱ्या एकाने विचारले— " एकनाथांनी वर्णन केलेला रावण हा दाढीमिश्या असलेला आहे—असे का ? " विचारणारा तामिळनाडूचा होता. त्याची दुसरीही अडचण होती. अलाउद्दीन खिलजीची स्वारी, एकूणच मुसलमान राज्यकर्त्यांची आक्रमणे यांची त्याला कल्पना नव्हती.

परभाषीयांना केलेल्या या साहित्याच्या अध्यापनातून एक वेगळा लाभ मात्र फार मोठा असतो. मला स्वतःला आधीच्या दहा वर्षांतल्या अध्यापनात हा अनुभव कधी येऊ शकला नव्हता. तो असा —शिकवत असताना एखादी कल्पना, एखादं उदाहरण स्पष्ट करून सांगत असताना विद्यार्थी जर स्वतःच्या भाषेतलं चांगलं साहित्य वाचलेला असेल तर तो फार चांगली उदाहरणं देतो. आसामीतली केतकी पक्ष्यांची लोककथा, बेंद्रयांची कन्नडमधली कविता, कबीराचे दोहे, हिंदीच्या एखाद्या थेट बोलीतल्या काव्यपंक्ती, किंवा ओडिया भाषेतल्या म्हणी, कल्पना, लोकोक्ती सगळं बसल्याजागी आम्हाला ऐकायला मिळतं. इतर भाषांमधले साहित्यप्रकार, जुना साहित्येतिहास इ. ची माहिती कळते. एका तमिळ विद्यार्थ्यानं अशीच एक नाजूक कल्पना सांगितली होती. — एक प्रेयसी म्हणते, " माझा प्रियकर माझ्या हृदयातच आहे म्हणून मी कधी गरम अन्न खात नाही कारण त्याला पोळेल. " पावसाला शेतकऱ्याच्या दृष्टीनं किती महत्त्व असतं ते सांगताना एक कानडी विद्यार्थी म्हणाला, " आमच्याकडे सावकार कर्ज देताना शेतकऱ्याला म्हणतो, चिखलाने भरलेले पाय तारण म्हणून घेऊन ये. " आपण नकाशावर पाहिलेल्या किंवा यादीत वाचलेल्या भाषा इथे आमच्यापुढे जिवंत होतात. एक भाषा देत असताना अनेक भाषांकडून आम्हाला मिळतं हा अनुभव फक्त परभाषीयांना आपली भाषा, साहित्य शिकवतानाच येतो.

**पश्चिम विभागीय भाषाकेंद्र, डेकन कॉलेज, पुणे ४११००६**





अनुक्रमणिका

# तीन कविता

श्याम विमल

## उन्हाचे तुकडे

पक्ष्यांनी कुरतडून कुरतडून
कित्येक तुकडे—
विखरवून टाकले
—उन्हाचे
झाडातळी.

आणि मी ते
सोन्याचे तुकडे
वेचत राहिलो दिवसभर.
सगळे मी आपल्या डोळ्यात
ठेवून दिलेलेयत सांभाळून.

उद्या मी हे
नव्या सूर्याला देईन.

मला खात्री आहे
उद्यासुद्धा सूर्य उगवेल.

## वाळूवर तुझे नाव

मी वाळूवर
तुझं नाव लिहून
आलोय निघून,
निदान
ती वाळू आपल्या मुठीत घेऊन
जेवढी दाबली
तेवढ्या वेगानी कणाकणानी

ती झिरपून पडली...
आशा होती पण शेवटच्या क्षणी
मरून गेली.

मी एकदा पुन्हा मृगतृष्णेकडून
फसून आलोय म्हणून
वाळूवर तुझं नाव लिहून
परत आलोय निघून.

## पहाटलं तर

तेव्हा माझ्या मनाच्या अंगणी
कुणी फुरफुरून गातो—
भल्या पहाटे पहिल्या पाखराचे
पंख जेव्हा फडफडत असतात.

तेव्हा माझ्या डोळ्यांत
वेदनेची ओल भरून जाते—
जेव्हा ताज्या फुलावर
दवाचा थेंब दृष्टीत येत असतो.

तेव्हा माझ्या रोमरोमांत
कंप पसरून जातो—
जेव्हा लहान पाकळ्यांवर
वारा थरथरत असतो.

जाता जाता वाट चुकून जाते
खेडं येतं
परदेशी गातो
ठणका लागतो कुठेतरी मनात—
जेव्हा बासरीतून नाद
अजब
माझ्या कानांत येत असतो.

**आय–बी·२२, लाजपतनगर, नयी दिल्ली ११००२४**





अनुक्रमणिका

[ श्यामविमल शर्मा यांचा पंजाबीभाषी घरात १९३१ मध्ये जन्म झाला. सध्या दिल्लीमध्ये शाळेत हिंदी व संस्कृत शिकवतात. 'श्यामविमल' या नावाने हिंदी भाषेत लेखन करतात. चार कादंबऱ्या, कालिदासाच्या 'ऋतुसंहार' काव्याचा संस्कृत वरून अनुवाद, आणि 'दीमक की भाषा' (१९७०, दीमक म्हणजे वाळवी) हा कवितासंग्रह प्रसिद्ध झाला आहे. १९७१–७२ मध्ये डेकन कॉलेजमधील पश्चिम विभागीय भाषाकेंद्रात मराठी भाषा शिकले. 'अष्टावक्र' हा आजकालच्या आठ हिंदी कवींच्या निवडक कवितांचा संग्रह द्विभाषी स्वरूपात प्रकाशनाच्या वाटेवर आहे. (संकलन आणि समोरच्या पानावरचा मराठी अनुवाद श्यामविमल यांचा.) यांनी मराठीतून कविता लिहिल्या आहेत. अशा कवितांच्या 'उन्हाचे तुकडे' या अप्रकाशित संग्रहाला १९८३ मध्ये केंद्रीय हिंदी निदेशालयाकडून २००० रुपयांचे पारितोषिक मिळाले आहे. तो प्रकाशित झालेला पाहण्याची उमेद बाळगून आहेत. त्या संग्रहातून इथे तीन कविता घेतल्या आहेत. परभाषी भारतीयांना मराठी शिकवण्याचे हे एक अनपेक्षित फलित ! ]

---



---





अनुक्रमणिका

# गंगंकडं अन राकिसाकडं

**कल्याण काळे.**

बार्शीपासून ३० कि. मी. अंतरावर माझं परंडा हे गाव आहे. या भागातील बहुजनसमाजाची भाषा साधारणपणे पुणे भागातील बहुजनसमाजाच्या भाषेसारखीच असली तरी प्रादेशिक सुरावट ( हेल ), काही शब्दविशेष, आणि थोडे व्याकरणिक प्रयोग यांमुळे वेगळी ठरते. पण अनाकलनीय होईल इतकी वेगळी नाही. या भाषेतील दिशावाचक संकेत, वैशिष्ट्यपूर्ण वाटल्याने वाचकांसाठी येथे ते देत आहे. जमिनीच्या तंट्यात आपल्या जमिनीच्या चतुःसीमा वकिलाला समजावून सांगणे आवश्यक असते. त्या संबंधात या भागातील वकील आणि पक्षकार यांच्यात पुढीलप्रमाणे संवाद होतो.

वकील—तुझी जमीन कोणत्या दिशेला आहे ?

पक्षकार—गावाच्या वरलाकडं हाय.

वकील—तिच्या चतुःसीमा सांग बरं.

पक्षकार—वरलाकडनं कंडारीचा रस्ता जातो. खाललाकडं बाबू सुताराचं श्येत हाय. राकिसाकडं मपल्या ( माझ्या ) सासऱ्याची जिमिन हाय. आन नीट गंगंकडं माज्या भावाची जिमिन हाय.

या संवादातील गंगंकडं, राकिसाकडं, खाललाकडं, आणि वरलाकडं हे दिशावाचक शब्द आपलं लक्ष वेधून घेतात. गंगकडं म्हणजे उत्तरेला, राकिसाकडं म्हणजे दक्षिणेला, खाललाकडं म्हणजे पूर्वेला, आणि वरलाकडं म्हणजे पश्चिमेला. यातील 'राकिसाकडं' हा शब्द सोडल्यास बाकीचे तीन शब्द नदी-संस्कृतीशी जवळीक दाखवतात. गोदावरीला महाराष्ट्रात गंगा म्हणतात हे सर्व विश्रुत आहे. ती आमच्या गावापासून बरीच दूर आहे. पण ती उत्तरेला असल्यामुळे 'गंगंकडं' या शब्दाने उत्तर दिशेचा बोध होतो. गोदावरी काय किंवा आमच्या भागातील सीना, भीमा या नद्या काय बहुतेक नद्या पूर्ववाहिनी आहेत. त्यामुळे वरलाकडं या शब्दाने नदीच्या वरलाकडे म्हणजे ती ज्या दिशेकडून वाहात येते ती दिशा असा बोध होतो. अर्थात ती पश्चिम दिशाच होय. खाललाकडं म्हणजे नदी ज्या दिशेने जाते ती दिशा म्हणजे पूर्वदिशा निर्दिष्ट होते. राकिसाकडं या शब्दाने दक्षिण दिशेचा बोध होतो. हा अर्थात रामायणाच्या प्रभावाचा निदर्शक आहे. रावणाची लंका, राक्षसांची वसाहत दक्षिण दिशेला असल्याचा रामायणात उल्लेख आहे. त्यामुळे राकीस म्हणजे राक्षस. त्यांची दिशा या अर्थाने दक्षिण दिशेसाठी राकिसाकडं हा प्रयोग होतो.

परंडा हे गाव उस्मानाबाद जिल्ह्यात असून सोलापूर जिल्ह्याच्या सीमेजवळ आहे. त्या भागात हे दिशावाचक संकेत रूढ आहेत.

**मराठी–विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११००७**





अनुक्रमणिका

विचारसंकलन

# वि. वा. शिरवाडकरांचा भाषाविचार

दत्तात्रय दिनकर पुंडे

## १. सामाजिक चिंतनातून साकारलेला भाषाविचार

अनेक मान्यवर साहित्यिकांनी आपल्या साहित्य संमेलनप्रसंगी केलेल्या अध्यक्षीय भाषणांतून किंवा अन्य सभा-परिषदांतील भाषणांतून मराठी भाषाव्यवहाराविषयी विचार मांडलेले आहेत. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, न. चिं. केळकर, अनंत काणेकर, वि. भि. कोलते, कुसुमावती देशपांडे इत्यादींनी मराठी भाषेचे महत्त्वमापन करणारे विचार मांडलेले आहेत. साहित्यिक या नात्याने भाषाविषयक विचार आपल्या भाषणातून—लेखनातून मांडण्याची एक परंपराच दिसून येते. कुसुमाग्रज तथा वि. वा. शिरवाडकर यांनी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय व्यासपीठावरून तसेच अन्य संमेलने व परिषदांतून मराठी भाषेसंबंधी काही विचार मांडलेले आहेत.[1] तथापि शिरवाडकरांनी हे जे विचार मांडले आहेत ते केवळ एक साहित्यिक या नात्याने नव्हे तर लोकशाहीवर निष्ठा असणारा एक दक्ष नागरिक म्हणून. आपल्या आजूबाजूस, समाजात, राष्ट्रात घडणाऱ्या घटनांना स्वतःचा विचारशुद्ध प्रतिसाद देणारे एक सामाजिक मन शिरवाडकरांकडे आहे. त्यांचा भाषाविचार एका सामाजिक चिंतनातून साकारलेला आहे. शिरवाडकरांच्या सामाजिक मनाचा प्रतिसाद म्हणजे केवळ भावनाप्रक्षोभातून उद्‌भवलेली प्रासंगिक प्रतिक्रिया नसते तर त्यात एक निरामय समाजधारणेची दृष्टी व विचारधारा असते; ही गोष्ट त्यांच्या ललित वाङ्मयातून जशी जाणवते, तशीच ती त्यांनी व्यक्त केलेल्या भाषाविचारातूनही आपल्या लक्षात येते. शिरवाडकरांनी 'अंग्रेजी हटाओ' आंदोलनाचा केलेला पुरस्कार, केंद्रशासनाची भाषा म्हणून केलेली हिंदी भाषेची शिफारस, आणि सामाजिक लोकशाही रुजविण्याचे अपरिहार्य साधन म्हणून प्रांतासाठी धरलेला प्रांतभाषेचा आग्रह (उदा० महाराष्ट्रासाठी मराठीचा आग्रह) यांमध्ये केवळ त्यांच्या व्यक्तिगत आवडीनिवडीवर आधारलेल्या मतांचा भाग नसून एक लोकशाहीप्रधान विकसनशील राष्ट्र डोळ्यांसमोर ठेवून केलेले एक समाज वैज्ञानिक चिंतनच आहे. वेगवेगळ्या ठिकाणी वेगवेगळ्या संदर्भात शिरवाडकरांनी इंग्रजी, हिंदी

व मराठी या भाषांविषयी जे विचार मांडलेले आहेत ते विकासोन्मुख भारतीय लोकशाही केंद्रस्थानी ठेवूनच. या तिन्ही भाषांबाबत बोलताना ते भाषा आणि समाज यांचे परस्परसंबंध तपासतात, नाते लक्षात घेतात आणि सामाजिक मूल्यनिकषांवरच भर देताना दिसतात.

## २. "अंग्रेज़ी हटाओ '—का?

दिनांक १७ व १८ ऑक्टोबर १९५९ या दोन दिवशी नाशिक येथे ' प्रथम अखिल भारतीय अंग्रेजी हटाओ संमेलन ' झाले. या संमेलनाच्या स्वागताध्यक्षपदावरून शिरवाडकरांनी लोकशाही समाजधारणेसाठी इंग्रजीच्या उच्चाटणाची अपरिहार्यता निःसंदिग्धपणे प्रतिपादन केली.

इंग्रजीच्या उच्चाटणाचा प्रश्न हा इंग्रजी-वैराचा किंवा परकीय भाषा-द्वेषाचा नसून तो लोकशाही-धारणेचा आहे अशी शिरवाडकरांची इंग्रजी-विरोधामागची भूमिका आहे. " जी राजवट विदेशी—सर्वसामान्य लोकांना न समजणाऱ्या—भाषेमध्ये आपला बहुतांश व्यवहार करते, ती लोकशाही राजवट आहे असे यथार्थतेने म्हणता येणार नाही " असे मत शिरवाडकर व्यक्त करतात. त्यामुळे इंग्रजीचे उच्चाटन ही त्यांना लोकशाही संस्थापनेच्या प्रक्रियेतून निर्माण झालेली गरजेची बाब वाटते. " लोक आणि राज्य यांच्या भाषा जर भिन्न असतील तर ते लोकशाही राज्य होऊ " शकणार नाही हे त्यांचे निदान आहे. केवळ दोनेक टक्के लोकांना येणारी—समजणारी इंग्रजी भाषा जर राजव्यवहारात वावरू लागली " तर भारतीय लोकशाहीला. . .हुकूमशाहीचे स्वरूप प्राप्त होणार आहे. " असा धोक्याचा इशाराही ते देतात. त्यांच्या मते इंग्रजीचे उच्चाटन करण्यात अडचण आहे. " ती केवळ आपल्या मानसिक कमकुवतपणाची." स्वातंत्र्योत्तर काळातही राजव्यवहारात आणि अन्य सामाजिक क्षेत्रात इंग्रजीचा वापर होत राहाणे ही गोष्ट शिरवाडकरांना परकीय गुलामगिरीची द्योतकच वाटते. म्हणूनच " स्वराज्याचा प्रश्न ज्या श्रद्धेने आपण सोडविला त्याच श्रद्धेने भाषेचा प्रश्नही आपण तडीस लावणे आज आवश्यक होऊन बसले आहे. " असे ते सांगतात.

लोकशाहीच्या उभारणीस आवश्यक अशा अनेक स्थिरतत्त्वांपैकी " भाषा हे एक स्थिर-तत्त्व आहे. " असे शिरवाडकर मानतात. " जोपर्यंत सरकारच्या कारभारात आणि शिक्षणाच्या परिसरात स्वदेशी भाषांना आपली हक्काची प्रतिष्ठा प्राप्त होत नाही तोपर्यंत लोकशाही समाजवाद हा शब्दप्रयोग अयथार्थ होय " अशा शब्दांत शिरवाडकर भाषेची सामाजिक लोकशाहीशी सांगड घालतात.

विकास–योजना राबविणे महत्त्वाचे आहे असे सांगून भाषाविषयक प्रश्न डावलण्याचे राजकारण्यांचे धोरण शिरवाडकरांना रुचत नाही.[१] देशापुढील अग्रक्रमाचे प्रश्न म्हणून विकास-योजना राबवायच्या की लोकभाषा-तत्त्वाची अंमलबजावणी करायची असा विकल्प निर्माण होण्याचे कारणच काय, असा शिरवाडकरांचा सत्ताधारी राजकारण्यांना सवाल आहे. कारण लोकशाहीयुक्त समाजाच्या विकासासाठी भाषिक

प्रश्नाचे " महत्त्व आणि निकड ही या ( विकास ) कार्याइतकीच किंबहुना त्याहूनही अधिक आहे " लोक-भाषा-प्रश्नाला डावलून केवळ योजना राबविण्याच्या " धोरणात कारखान्यांची व धरणांची जितकी कदर आहे, तितकी माणसांची नाही. " असा आरोप शिरवाडकर करतात. " ...बंधाऱ्यांच्या बांधकामांपेक्षा आणि धरणांच्या उभारणीपेक्षा लोकशाही संरक्षण ही गोष्ट अधिक महत्त्वाची व निकडीची आहे. " असे त्यांचे प्रतिपादन आहे.

तात्पर्य लोकभाषा-वापरातच लोकशाहीचे संरक्षण समाविष्ट असल्याचे शिरवाडकर एक प्रकारच्या हिरीरीने प्रतिपादन करतात.

शिरवाडकरांनी १९५९ त मांडलेले हे विचार किती शास्त्रशुद्ध आणि मूलगामी होते हे भाषा वैज्ञानिक डॉ. ना. गो. कालेलकर यांनी १९६७ त दिलेल्या " भारतीय भाषा : नव्या जबाबदाऱ्या " या व्याख्यानाचा आशय लक्षात घेतला की समजते. या व्याख्यानात कालेलकर म्हणतात, " भाषिक राज्ये म्हणजे ज्या राज्यांचा कारभार तिथे अतिशय मोठ्या प्रमाणात बोलल्या जाणाऱ्या आणि म्हणूनच तिथल्या निरक्षर लोकांनाही समजणाऱ्या भाषेत चालतो अशी राज्ये निर्माण करणे हे केवळ हितावहच नव्हे तर लोकशाहीच्या मूलभूत तत्त्वांना धरून आहे. कारण आपले सरकार काय करते हे समजून घेण्याचा आणि स्वराज्यातल्या प्रवृत्तीत जास्तीत जास्त भाग घेण्याचा हक्क प्रत्येक नागरिकाला आहे. "[३] एका ललित साहित्यिकाच्या आणि एका भाषा-वैज्ञानिकाच्या भाषाविचारातील ही एकवाक्यता लक्षात घेण्याजोगी आहे. समाजमनाची कदर करणारा शिरवाडकरांसारखा ललित साहित्यिक जेव्हा भाषेसारख्या समाजाच्या जिव्हाळ्याच्या प्रश्नाचा मुळातून विचार करू लागतो तेव्हा तो सामाजिक सत्याच्या तळाशी सहजपणे जाऊन भिडतो.

सारांश, लोकभाषेच्या अनुपस्थितीत लोकशाहीचे संरक्षण अशक्य आहे; राजभाषा ही लोकभाषा नसल्यास लोकशाही राज्य हुकूमशाहीच्या वाटेने जाण्याचा धोका संभवतो; आणि सुरळीत समाजजीवनाकरिता लोकभाषेतून व्यवहार चालण्याची निकड आहे, यांसारखे शिरवाडकरांचे विचार स्वभाषेच्या आणि भारतीय भाषांच्या केवळ प्रेमातून जन्मलेले नसून त्यामागे सामाजिक भाषा विज्ञानाची आणि लोकशाही मूल्यांची बैठकही आहे.

आपली इंग्रजीविरुद्ध लोकशाहीनिष्ठ भूमिका मांडून झाल्यावर शिरवाडकर इंग्रजीच्या तुलनेत भारतीय भाषांवर घेतल्या जाणाऱ्या आक्षेपांना उत्तरे देतात. " भारतातील अत्यंत समृद्ध भाषाही शिक्षणाच्या उच्च पातळीवर आणि सरकारी कारभाराला अपुऱ्या पडतील " हा आक्षेप त्यांना केवळ ' तकलादी ' वाटतो. " भाषेची समर्थता आणि श्रीमंती ही पोकळीमध्ये वाढू शकत नाही. सर्व प्रकारचे सामाजिक, राजकीय, शैक्षणिक व शास्त्रीय व्यवहार जेव्हा एखाद्या भाषेमध्ये होऊ लागतात तेव्हाच त्या भाषेची प्रगती होते, ती स्वतःचा विकास करून घेते व समाजाच्या विकासालाही उलट पक्षी चालना देऊ लागते. " अशी भाषेच्या सामाजिक अस्तित्वासंबंधीची चिकित्साच





अनुक्रमणिका

शिरवाडकर आक्षेपकांसमोर ठेवतात. "इंग्रजीसारख्या परकीय भाषेच्या छत्राखाली आम्ही व्यवहार करीत राहिलो तर आमच्या मातृभाषा नेहमीच दरिद्री, प्रचलित व्यवहारापासून दूर आणि क्षीण अशा राहातील." असा इशारा ते भाषा आणि समाजव्यवहार यांचे परस्परसंबंध लक्षात घेऊन देतात.

'अंग्रेजी हटाओ' चळवळीवर होणारा सोवळेपणाचा, संकुचितपणाचा, प्रतिगामी-पणाचा आरोप शिरवाडकरांना त्या चळवळीत अनुस्यूत असलेल्या सामाजिक धोरणामुळे मान्य नाही. "खुद्द इंग्रजीतीलही शेकडो शब्द आवश्यक तेथे स्वभाषेत आत्मसात करून घ्यायला कोणताही प्रत्यवाय आहे, असे मी तरी समजत नाही. भाषेचा ओघ नदीप्रमाणे विविध प्रवाहांकडून खंडणी घेत पुढे जात असतो," हे शिरवाडकरांचे विधान इंग्रजी भाषेबद्दलची त्यांची भूमिका अद्वेष्ट्याची असल्याचे सुचविते.

अशा रीतीने शिरवाडकरांची 'अंग्रेजी हटाओ'ची भूमिका ही संधिसाधू राजकारण्यांची घोषणा नाही किंवा केवळ देशभिमानाच्या उद्रेकातून प्रकटलेली आततायी भावना नाही. 'अंग्रेजी हटाओ'ही त्यांना लोकशाहीच्या पूर्ततेची मागणी वाटते.

## ३. हिंदी भाषेचा वाद : पाध्ये विरुद्ध शिरवाडकर

'एक राष्ट्र—एक भाषा'ही एकोणिसाव्या शतकातील विचारप्रणाली भारतीय नेत्यांनी स्वीकारली आणि हिंदीला राष्ट्रभाषेचे स्थान दिले; आता ही विचारसरणी कालबाह्य आणि सध्याच्या परिस्थितीत विसंवादी असल्यामुळे राष्ट्रभाषेच्या प्रश्नाचा पुन्हा नव्याने विचार करणे जरूर आहे, असे मत श्री. प्रभाकर पाध्ये यांनी मांडले आहे.[४] त्यावर शिरवाडकरांनी आपले विचार खालीलप्रमाणे व्यक्त केलेले आहेत :

(क) भाषेच्या संदर्भातील 'एक भारती' ही कल्पना शिरवाडकरांना पाध्ये म्हणतात तशी केवळ 'राष्ट्रवादाच्या विचाराचे वैचारिक उपप्रमेय वाटत नाही शिरवाडकर 'एक–भारती' ही भारतीय लोकशाहीच्या संदर्भात एक आवश्यकता मानतात. "जोपर्यंत भारत हे एक राष्ट्र आहे आणि येथील राज्यकारभार लोक-शाहीच्या तत्त्वानुसार व्हायला हवा असे आपण मानतो...तोपर्यंत ही आवश्यकता नष्ट होत नाही." असे शिरवाडकरांना वाटते.

(ख) पाध्ये यांच्या बहुरंगी राष्ट्रवादात भाषाविषयक धोरणाचा तपशील पाहिजे तितक्या विस्ताराने आला नाही हे न्यून शिरवाडकर प्रथम नमूद करतात आणि पाध्यांच्या मताला विरोध दर्शविताना म्हणतात, "हिंदीच्या ऐवजी इंग्रजी भाषा ही सरकारी भाषा ठेवली म्हणजे बहुरंगी राष्ट्रवाद सिद्ध होईल असे म्हणणे...निव्वळ आत्मवंचनेचे आहे."

(ग) पुढील पाचपन्नास वर्षांत युरोपचे एक संयुक्त राज्य होणार आहे आणि हे राज्य 'एक–भाषे'च्या पायावर उभारावे असा विचार तेथे कोणाच्याही मनात नाही

अशी माहिती पाध्ये देतात. शिरवाडकरांच्या मते युरोपीय राष्ट्रे ही राष्ट्र म्हणून पूर्ण विकसित आहेत आणि आता ती संयुक्त राज्याचे स्वप्न पाहात आहेत. याउलट भारतात नव्याने उदयाला आलेली लोकशाही अद्यापही विकासोन्मुख आहे आणि राष्ट्र बनण्याची भारताची प्रक्रिया चालू आहे. त्यामुळे युरोपीय देशांचा संभाव्य संयुक्त राज्य-कल्पनेतील भाषाविषक प्रश्न आणि भारताचा राष्ट्रभाषाविषयक प्रश्न या दोन गोष्टी असम ठरतात. अशा असम गोष्टींचा विचार एकत्र करणे शिरवाडकरांना 'तर्कशुद्ध' वाटत नाही.

(घ) इंग्रजीच्या उच्चाटनाच्या मागणीला पाध्ये यांनी दिलेले 'सवंग' हे विशेषण शिरवाडकरांना 'अस्थानी' वाटते. "ही मागणी जर बहुसंख्य लोकांची असेल तर तेवढ्या कारणामुळे ती उपेक्षणीय अथवा अयोग्य ठरत नाही." असे सांगून शिरवाडकर स्वातंत्र्याची मागणीही सर्वांची होती आणि मूठभर इंग्रजधार्जिण्यांना ती सवंगच वाटत होती याची स्वातंत्र्यासाठी लेखणी झिजविणाऱ्या पाध्यांना आठवण देतात. शिरवाडकरांच्या दृष्टीने "मागणी सर्वांची आहे, अनेकांची आहे की थोड्यांची आहे हा प्रश्न गौण आहे. ती बरोबर आहे की नाही याचाच विचार" होणे आवश्यक आहे.

(ङ) "*मध्यवर्ती राज्य शासनात इंग्रजी* ठेवल्यामुळे त्या शासनामध्ये काहीही *कमतरता येणार नाही,* पार्लमेंटचा (आणि सरकारचाही) सर्व व्यवहार इंग्रजीतून झाला तरी सामान्य माणसाचे काहीही बिघडत नाही" इत्यादी विधानेही शिरवाडकरांना "सर्वस्वी अस्वीकारार्ह" वाटतात. सामान्य माणसाचा देशातील राजसत्तेशी प्रत्यक्ष संबंध प्रस्थापित होण्याच्या दृष्टीने इंग्रजी भाषा हा शिरवाडकरांना एक फार मोठा अडसर वाटतो. अशाने लोकशाही देशात राजकीय क्षेत्रातील आणि वरिष्ठ नेतृत्वाची कसोटी "लोकांशी असलेला संबंध" ही असण्याऐवजी "इंग्रजी व्याकरण-शुद्ध बोलणे" ही राहील आणि अर्थातच लोकशाही धोक्यात येईल, अशी भीतीही शिरवाडकर व्यक्त करतात.

(च) "इंग्रजी प्रादेशिक भाषांना मारक झाली नाही, उलट उपकारक झाली; पण हिंदी मात्र—ती राज्यभाषा झाली तर—प्रादेशिक भाषांना...गिळून टाकायचा प्रयत्न करील" अशी इंग्रजीची भलावण आणि हिंदीविषयक भीती पाध्ये सांगतात. शिरवाडकर प्रथम पाध्ये यांचे इंग्रजीविषयक मत खोडून काढतात. इंग्रजीमुळे मराठी व इतर प्रादेशिक भाषांचे नुकसान झाल्याची वस्तुस्थिती शिरवाडकर नजरेस आणत. "ज्या प्रमाणात एकूण ज्ञानविज्ञानाची, शिक्षणाची अथवा साहित्याची वाढ झाली त्या प्रमाणात" मराठीसारख्या प्रादेशिक भाषांची वाढ होऊ शकली नाही, ती समाजाच्या शासन, राजकारण, शिक्षण, व्यवसाय इत्यादी महत्त्वपूर्ण क्षेत्रातील इंग्रजीच्या वर्चस्वामुळेच; या इतिहाससिद्ध वस्तुस्थितीकडे शिरवाडकर लक्ष वेधतात. "समाजातील प्रमुख व्यवहारक्षेत्रांपासून अलग पडलेली भाषा निरामयपणे विकसित होईल हे अशक्यच आहे." अशी शिरवाडकरांची इंग्रजीमुळे झालेल्या प्रादेशिक

भाषांच्या हानीची मीमांसा आहे."

इंग्रजीचा आश्रय केल्यामुळे "नव्या व्यवहार वृत्तीची सहचरी अशी मराठी भाषा निर्माण झाली नाही आणि जुन्या किंवा प्रचलित व्यवहार-वृत्तीशी संबंधित अशी जुनी मराठी भाषा काही अंशी तरी स्मरणातून अस्तंगत झाली" असे मराठीचे इंग्रजी-मुळे झालेले दुहेरी नुकसान शिरवाडकर नजरेस आणतात. अशा रीतीने इंग्रजीमुळे मराठीचे वा अन्य भारतीय भाषांचे पोषण झाल्याचा/होण्याचा दावा फोल असल्याचे शिरवाडकर दिग्दर्शित करतात आणि "इंग्रजीची हजार ऋणे" मान्य करूनही "मराठी भाषेची तिने प्रगती घडवून आणली असे मानणे" कठीण आहे असे स्पष्ट मत सांगतात.

पाध्येकृत इंग्रजीची भलावण जरी शिरवाडकरांनी खोडून काढलेली असली तरी पाध्ये यांनी हिंदीच्या आक्रमणासंबंधी व्यक्त केलेल्या भीतीशी शिरवाडकर साधारणपणे सहमत आहेत. मात्र "राजकीय आणि सांस्कृतिक क्षेत्रातील आमचे प्रतिनिधी जागरूक राहिले तर या भीतीचे निराकरण होऊ शकेल" असेही ते म्हणतात. प्रादेशिक भाषेच्या रक्षणाकरिता "हिंदीचे म्हणजे मध्यवर्ती सरकारच्या राज्यभाषेचे व्यवहारक्षेत्र जास्तीत जास्त मर्यादित करणे आणि राज्यभाषेचे (यथामूल) व्यवहार क्षेत्र जास्तीत जास्त वाढविणे" ही उपाययोजना शिरवाडकर सुचवितात. त्याचबरोबर "एका गोत्रातील भाषा परस्परांना बाधक होण्याची शक्यता असते, त्याचप्रमाणे... त्या परस्परांना पोषक आणि साहाय्यक होण्याची शक्यता असते," हे ऐतिहासिक भाषाविज्ञानास संमत असलेले तत्त्व सांगून शिरवाडकर हिंदीविषयक भीतीचा ताण सैल करू पाहातात.

तात्पर्य शिरवाडकर इंग्रजीच्या विरोधात केंद्र सरकारची भाषा म्हणून हिंदीचा पुरस्कार करतात, भारताच्या घटक राज्यातील राज्यभाषांच्या संदर्भात हिंदीवर निश्चित व्यवहार-क्षेत्राची मर्यादा असण्याची आवश्यकता सांगतात. शिरवाडकरांनी हिंदीच्या आक्रमणाच्या भीतीच्या संदर्भात सुचविलेला हा तोडगा व्यवहार्य दिसतो.

### ४. मराठी अन्याय निर्मूलन

'अंग्रेजी हटाओ' चळवळीमागे शिरवाडकरांची जी लोकशाही रक्षिण्याची भूमिका आहे, तीच मराठी भाषेवर होणाऱ्या अन्यायाविरुद्ध आवाज उठविण्यासाठी वाळगलेली आहे. "हे मायभाषेचे संकीर्तन मी करतो आहे ते केवळ तिच्यासंबंधी मला वाटणाऱ्या काव्यात्मक प्रेमामुळे नव्हे. मायभाषेचा आश्रय घेतल्याशिवाय, समाजातील सर्व लौकिक व्यवहारांमध्ये तिची प्रतिष्ठापना केल्याशिवाय समाजाची सर्वांगीण प्रगती सर्वस्वी अशक्य आहे," ह्या त्यांच्या उद्‌गारावरून ते मराठीची बाजू घेतात ते सामाजिक प्रगतीवर लक्ष ठेवूनच, हे स्पष्ट व्हावे.

"राज्य व्यवहारात सर्व पातळीवर मराठी भाषेचा आणि फक्त मराठी भाषेचाच वापर होणे, त्याचप्रमाणे शिक्षण क्षेत्रात विद्यापीठातील सर्व अभ्यासांसाठी मराठी माध्यम

अशी माहिती पाध्ये देतात. शिरवाडकरांच्या मते युरोपीय राष्ट्रे ही राष्ट्र म्हणून पूर्ण विकसित आहेत आणि आता ती संयुक्त राज्याचे स्वप्न पाहात आहेत. याउलट भारतात नव्याने उदयाला आलेशी लोकशाही अद्यापही विकासोन्मुख आहे आणि राष्ट्र बनण्याची भारताची प्रक्रिया चालू आहे. त्यामुळे युरोपीय देशांचा संभाव्य संयुक्त राज्य-कल्पनेतील भाषाविषयक प्रश्न आणि भारताचा राष्ट्रभाषाविषयक प्रश्न या दोन गोष्टी असम ठरतात. अशा असम गोष्टींचा विचार एकत्र करणे शिरवाडकरांना 'तर्कशुद्ध' वाटत नाही.

(घ) इंग्रजीच्या उच्चाटनाच्या मागणीला पाध्ये यांनी दिलेले 'सवंग' हे विशेषण शिरवाडकरांना 'अस्थानी' वाटते. "ही मागणी जर बहुसंख्य लोकांची असेल तर तेवढ्या कारणामुळे ती उपेक्षणीय अथवा अयोग्य ठरत नाही." असे सांगून शिरवाडकर स्वातंत्र्याची मागणीही सर्वांची होती आणि मूठभर इंग्रजधार्जिण्यांना ती सवंगच वाटत होती याची स्वातंत्र्यासाठी लेखणी झिजविणाऱ्या पाध्यांना आठवण देतात. शिरवाडकरांच्या दृष्टीने "मागणी सर्वांची आहे, अनेकांची आहे की थोड्यांची आहे हा प्रश्न गौण आहे. ती बरोबर आहे की नाही याचाच विचार" होणे आवश्यक आहे.

(ङ) "मध्यवर्ती राज्य शासनात इंग्रजी ठेवल्यामुळे त्या शासनामध्ये काहीही कमतरता येणार नाही, पार्लमेंटचा (आणि सरकारचाही) सर्व व्यवहार इंग्रजीतून झाला तरी सामान्य माणसाचे काहीही बिघडत नाही" इत्यादी विधानेही शिरवाड-करांना "सर्वस्वी अस्वीकारार्ह" वाटतात. सामान्य माणसाचा देशातील राजसत्तेशी प्रत्यक्ष संबंध प्रस्थापित होण्याच्या दृष्टीने इंग्रजी भाषा हा शिरवाडकरांना एक फार मोठा अडसर वाटतो. अशाने लोकशाही देशात राजकीय क्षेत्रातील आणि वरिष्ठ नेतृत्वाची कसोटी "लोकांशी असलेला संबंध" ही असण्याऐवजी "इंग्रजी व्याकरण-शुद्ध बोलणे" ही राहील आणि अर्थातच लोकशाही धोक्यात येईल, अशी भीतीही शिरवाडकर व्यक्त करतात.

(च) "इंग्रजी प्रादेशिक भाषांना मारक झाली नाही, उलट उपकारक झाली; पण हिंदी मात्र—ती राज्यभाषा झाली तर—प्रादेशिक भाषांना...गिळून टाकायचा प्रयत्न करील" अशी इंग्रजीची भलावण आणि हिंदीविषयक भीती पाध्ये सांगतात. शिरवाडकर प्रथम पाध्ये यांचे इंग्रजीविषयक मत खोडून काढतात. इंग्रजीमुळे मराठी व इतर प्रादेशिक भाषांचे नुकसान झाल्याची वस्तुस्थिती शिरवाडकर नजरेस आणत. "ज्या प्रमाणात एकूण ज्ञानविज्ञानाची, शिक्षणाची अथवा साहित्याची वाढ झाली त्या प्रमाणात" मराठीसारख्या प्रादेशिक भाषांची वाढ होऊ शकली नाही, ती समाजाच्या शासन, राजकारण, शिक्षण, व्यवसाय इत्यादी महत्त्वपूर्ण क्षेत्रातील इंग्रजीच्या वरचष्म्यामुळेच; या इतिहाससिद्ध वस्तुस्थितीकडे शिरवाडकर लक्ष वेधतात. "समाजातील प्रमुख व्यवहारक्षेत्रांपासून अलग दडलेली भाषा निरामयपणे विकसित होईल हे अशक्यच आहे." अशी शिरवाडकरांची इंग्रजीमुळे झालेल्या प्रादेशिक

भाषांच्या हानीची मीमांसा आहे."

इंग्रजीचा आश्रय केल्यामुळे " नव्या व्यवहार वृत्तीची सहचरी अशी मराठी भाषा निर्माण झाली नाही आणि जुन्या किंवा प्रचलित व्यवहार-वृत्तीशी संबंधित अशी जुनी मराठी भाषा काही अंशी तरी स्मरणातून अस्तंगत झाली " असे मराठीचे इंग्रजी-मुळे झालेले दुहेरी नुकसान शिरवाडकर नजरेस आणतात. अशा रीतीने इंग्रजीमुळे मराठीचे वा अन्य भारतीय भाषांचे पोषण झाल्याचा/होण्याचा दावा फोल असल्याचे शिरवाडकर दिग्दर्शित करतात आणि " इंग्रजीची हजार ऋणे " मान्य करूनही " मराठी भाषेची तिने प्रगती घडवून आणली असे मानणे " कठीण आहे असे स्पष्ट मत सांगतात.

पाध्येकृत इंग्रजीची भलावण जरी शिरवाडकरांनी खोडून काढलेली असली तरी पाध्ये यांनी हिंदीच्या आक्रमणासंबंधी व्यक्त केलेल्या भीतीशी शिरवाडकर साधारणपणे सहमत आहेत. मात्र " राजकीय आणि सांस्कृतिक क्षेत्रातील आमचे प्रतिनिधी जागरूक राहिले तर या भीतीचे निराकरण होऊ शकेल " असेही ते म्हणतात. प्रादेशिक भाषेच्या रक्षणाकरिता " हिंदीचे म्हणजे मध्यवर्ती सरकारच्या राज्यभाषेचे व्यवहारक्षेत्र जास्तीत जास्त मर्यादित करणे आणि राज्यभाषेचे ( यथामूल ) व्यवहार क्षेत्र जास्तीत जास्त वाढविणे " ही उपाययोजना शिरवाडकर सुचवितात. त्याचबरोबर " एका गोत्रातील भाषा परस्परांना बाधक होण्याची शक्यता असते, त्याचप्रमाणे... त्या परस्परांना पोषक आणि साहाय्यक होण्याची शक्यता असते, " हे ऐतिहासिक भाषाविज्ञानास संमत असलेले तत्त्व सांगून शिरवाडकर हिंदीविषयक भीतीचा ताण सैल करू पाहातात.

तात्पर्य शिरवाडकर इंग्रजीच्या विरोधात केंद्र सरकारची भाषा म्हणून हिंदीचा पुरस्कार करतात, भारताच्या घटक राज्यातील राज्यभाषांच्या संदर्भात हिंदीवर निश्चित व्यवहार-क्षेत्राची मर्यादा असण्याची आवश्यकता सांगतात. शिरवाडकरांनी हिंदीच्या आक्रमणाच्या भीतीच्या संदर्भात सुचविलेला हा तोडगा व्यवहार्य दिसतो.

## ४. मराठी अन्याय निर्मूलन

' अंग्रेजी हटाओ ' चळवळीमागे शिरवाडकरांची जी लोकशाही रक्षिण्याची भूमिका आहे, तीच मराठी भाषेवर होणाऱ्या अन्यायाविरुद्ध आवाज उठविण्यासाठी बाळगलेली आहे. " हे मायभाषेचे संकीर्तन मी करतो आहे ते केवळ तिच्यासंबंधी मला वाटणाऱ्या काव्यात्मक प्रेमामुळे नव्हे. मायभाषेचा आश्रय घेतल्याशिवाय, समाजातील सर्व लौकिक व्यवहारांमध्ये तिची प्रतिष्ठापना केल्याशिवाय समाजाची सर्वांगीण प्रगती सर्वस्वी अशक्य आहे, " ह्या त्यांच्या उद्गारावरून ते मराठीची बाजू घेतात ते सामाजिक प्रगतीवर लक्ष ठेवूनच, हे स्पष्ट व्हावे.

" राज्य व्यवहारात सर्व पातळीवर मराठी भाषेचा आणि फक्त मराठी भाषेचाच वापर होणे, त्याचप्रमाणे शिक्षण क्षेत्रात विद्यापीठातील सर्व अभ्यासांसाठी मराठी माध्यम

केवळ उपलब्ध नव्हे तर रूढ करणे हे आवश्यक आणि अपरिहार्य झाले आहे, '' असे ठाम मत शिरवाडकर मांडतात. मराठीची अपरिहार्यता डावलून शासकीय व अन्य क्षेत्रात इंग्रजीच्या वापराची खोटी निकड काही लोक अद्यापही उराशी बाळगून आहेत याचे शिरवाडकरांना सखेद आश्चर्य वाटते. '' लोकांना न समजणाऱ्या भाषेत चालणारी लोकशाही हे अद्‌भुत नवल या देशात सध्या घडत आहे '' असे उपहास-प्रचुर उद्‌गारही ते काढतात. '' सरकारी आणि शैक्षणिक प्रांतांतून इंग्रजीला वेळीच निरोप दिला नाही तर देशातील एकतेला आणि सामाजिक विकासाच्या गतीला हीही एक खीळ लागल्याशिवाय राहाणार नाही '' असा स्पष्ट इषारा ते देतात. शिरवाडकर हे जे सारे ' इंग्रजी हटाओ ' आंदोलनाचे समर्थन करतात ते मराठीची अपरिहार्यता सुस्पष्ट करण्याकरिताच. '' शास्ते आणि शासित यांच्यामध्ये समान लोकभाषेचा अनुबंध नसताना लोकशाही आणि समाजवादी लोकशाही या संज्ञा अतिशयोक्तीच्या होत नाहीत काय ? '' हा त्यांचा रोकडा सवाल; किंवा '' परभाषेच्या स्वीकारामुळे शासनाचा परकीपणा कायम राहतो, आणि त्यामधून अनेक दोष, अनेक विसंवाद निर्माण होतात. '' हे त्यांचे वस्तुस्थितीचे निदर्शन यांमध्ये त्यांच्या इंग्रजीविषयक द्वेषाचे प्रदर्शन नसून मराठी भाषेच्या अपरिहार्यतेच्या जाणिवेचे प्रगट–दर्शन आहे.

केवळ शासनव्यवहारातच नव्हे तर एकूण दैनंदिन व्यक्तिगत जीवनात आणि त्याला वेढणाऱ्या सामाजिक जीवनातही शिरवाडकरांना मराठीची पुनःस्थापना व्हायला हवी आहे. '' एका बाजूने इंग्रजी व दुसऱ्या बाजूने हिंदी अशा दोन सबळ भाषांच्या रेट्यात सापडलेल्या मराठी भाषेचे भवितव्य '' शिरवाडकरांना '' खरोखरीच संशयास्पद '' वाटते. संयुक्त महाराष्ट्र आंदोलनात प्रत्यक्ष सहभागी झालेल्या शिरवाडकरांनी ''...संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेनंतर मराठीला चांगले दिवस येतील राजभाषा आणि व्यवहारभाषा म्हणून ती राज्यात प्रस्थापित होईल '' अशी रास्त अपेक्षा बाळगली होती. ती अपेक्षा तर सफल झाली नाहीच, उलट '' हिंदी इंग्रजीच्या वर्चस्वाबाबत एक अगतिकतेची, शरणागतीची '' वृत्ती त्यांच्या नजरेस आली संयुक्त महाराष्ट्राची स्थापना उंबरठ्यावर असताना शिरवाडकरांनी काढलेले उद्‌गार येथे साहजिकच आठवतात, ते म्हणतात, '' महाराष्ट्रामध्ये आपण संयुक्त महाराष्ट्राची अत्यंत कणखरपणाने मागणी केली आणि आपल्या त्या प्रयत्नांची पूर्तताही दाराशी येऊन उभी राहिली आहे. परंतु महाराष्ट्राच्या स्थापनेनंतर या 'मंदिरात मातृभाषेचा जर दिवा लागणार नसेल, तिच्या अंगावरची लक्तरे जर दूर होणार नसतील, राज्य-कारभाराची आणि शिक्षणाची भाषा म्हणून जर तिचा स्वीकार होणार नसेल, तर नकाशावरील रेषा बदलल्या पण संयुक्त महाराष्ट्राची स्थापना झाली नाही असेच खरोखर म्हणावे लागेल.'' शिरवाडकरांच्या ह्या उद्‌गारामागे असणारी मराठी माणसाबद्दलची आणि म्हणून मराठी भाषेबद्दलची कळकळ थेट अंतःकरणात पोहोचेल अशीच आहे.

आज संयुक्त महाराष्ट्राची स्थापना होऊन दोन दशकांपेक्षा अधिक कालावधी





अनुक्रमणिका

लोटलेला आहे. " तथापि शासन, विद्यापीठ आणि सामाजिक व्यवहार यांमध्ये मराठी भाषा अद्यापही अंग चोरूनच उभी आहे. त्यामुळे तिचे अस्तित्व, तिची प्रगती धोक्यात आहे. " कारण शिरवाडकर म्हणतात त्याप्रमाणे अखेरतः " भाषा जिवंत राहाते आणि संपन्न होत जाते ती जीवनाच्या विविध प्रांतात तिचा वापर झाला तरच.' एकूण समाजजीवनाच्या बाहेर "...भाषेच्या प्रगतीचा दुसरा पर्यायी मार्ग अस्तित्वातच नाही."

मातृभाषेचा हा प्रश्न बिकट होण्याचे उत्तरदायित्व शिरवाडकर दोन गोष्टींवर टाकतात. पहिली म्हणजे शासनाचे भाषाविषयक प्रश्नातले वेळकाढूपणाचे धोरण आणि दुसरी म्हणजे शिक्षणक्षेत्रातील वारंवार बदलणारे धोरण व प्रयोग. शासनाकडून व विद्यापीठांकडून भाषेच्या संदर्भात जी अर्धवट आणि अनिश्चित धोरणे सध्या स्वीकारली जात आहेत ती शिरवाडकरांना ' निषेधार्ह ' वाटतात.

महाराष्ट्र शासनाने मराठीच्या वापराच्या दिशेने काही पावले उचलली आहेत ही गोष्ट शिरवाडकरांना अभिनंदनीय वाटते. पण महाराष्ट्रातल्या विद्यापीठांतील परिस्थिती मात्र निराशाजनक असल्याचे त्यांना आढळते. " परिभाषेच्या ठरावीक अडचणी सांगत "[५] सगळी विद्यापीठे स्वस्थ राहिल्याचे चित्र त्यांना खेदपूर्ण वाटते. विद्यापीठीय अभ्यासक्रमात मराठी माध्यम आणण्यात त्यांना "...न्यूनगंडाशिवाय दुसरी कोणतीही मोठी अडचण आहे असे दिसत नाही. " शिरवाडकर विद्यापीठांतून मराठी माध्यम जलद गतीने रूढ होण्याची अपेक्षा करतात ती केवळ शिक्षणसुलभतेच्या दृष्टीने नव्हे. " स्वभाषेचे ज्ञान हे केवळ भाषाज्ञान नसते, ते माणसाला आपल्या संस्कृतीच्या तळापर्यंत घेऊन जाणारे, भोवतालच्या जीवनाशी बांधणारे आणि पाया-खालच्या मातीत त्याची मुळे रुजविणारे असते. " शिरवाडकरांचे हे विचार शिक्षण-माध्यमाचा संबंध शिक्षण–सुलभतेपेक्षा लोकजीवनाशी जोडणारे आहेत.

शिरवाडकरांची हिंदी व इंग्रजी या भाषांबाबतची दृष्टी कधीही असहिष्णुतेची नाही. पण मराठी माणूस, मराठी मन, मराठी संस्कृती आणि भारतीय लोकशाही यांच्या उत्कर्षावर त्यांची नजर लागलेली असल्याने आपले विचार परखडपणे व्यक्त करण्यास ते कचरत नाहीत. ते म्हणतात, " हिंदीचा देशभाषा म्हणून जरूर आदर व्हावा; आजच्या युगाची ज्ञानभाषा म्हणून इंग्रजीचाही सन्मान व्हावा. परंतु या मानसन्मानाच्या मांडवातून मराठीला लज्जित अवस्थेत बाहेर घालविली जाऊ नये, वा तिची हक्काची जागा तिला नाकारण्यात येऊ नये."

### ५. परिभाषेचा प्रश्न

राज्यव्यवहारात मराठीचा वापर होऊ लागल्याबद्दल जरी शिरवाडकरांनी समाधान व्यक्त केले असले, तरी शासनाने स्वीकारलेल्या परिभाषा-निर्मितीबाबतच्या धोरणा-बाबत ते बरीचशी नाराजी बाळगून आहेत. " समाजभाषेपासून प्रशासनाची भाषा वेगळी असते आणि असायला हवी " असे जे मार्गदर्शक तत्त्व परिभाषा निर्मितीसाठी

स्वीकारले गेले ते समाज व शासन यांना एकमेकांपासून दूर ठेवणारे असल्याने शिरवाडकरांना अमान्य आहे. शासनव्यवहार हे अखेरतः लोकांचे व्यवहार असतात आणि मूलतः ते लोकांसाठी असतात म्हणून लोकांच्या भाषेपेक्षा वेगळी भाषा लोकांना बुचकळ्यात टाकणारी परिभाषा शिरवाडकरांना अनुपयुक्त वाटते.

"नवे शब्द तयार करताना इंग्रजी शब्दाचेच भाषांतर व्हायला हवे या आग्रहाऐवजी (ज्या अधिकारपदासाठी शब्द तयार करायचा) त्या अधिकाराची ज्यातून सूचना होईल असे स्वतंत्र वेगळे शब्द तयार करण्याची दृष्टी ठेवली असती तर हे काम अधिक सोपे झाले असते आणि बोजड शब्दांच्या उतरंडीही रचाव्या लागल्या नसत्या," हे शिरवाडकरांचे उपलब्ध परिभाषेच्या निरीक्षणातून तयार झालेले मत खरोखर विचार करण्याजोगे आहे. पारिभाषिक "शब्द वहिवाटीत येण्यासारखे, शक्य तेवढे परिचित, उच्चाराला सोपे आणि सर्वसामान्यांना मूळ स्वरूपात पेलतील असे हवेत" असे एक व्यवहार्य मार्गदर्शक तत्त्व शिरवाडकर सुचवितात.

## ६. एका जागरूक नागरिकाची तळमळ

"भाषा हे समाजाच्या विकासातील आधारभूत व स्थिर असे तत्त्व आहे. राजकीय सामाजिक अथवा आर्थिकदृष्ट्या समाजाच्या बांधकामात नाना प्रकारचे फेरबदल होतात. जी मूल्ये आधारभूत व चिरंतन आहेत असे आपण मानतो तीही बदलतात. बदलत नाही ती फक्त भाषा. या अनेक मन्वंतरांमध्ये माणसाची सतत सोबत करून त्याच्या प्रगतीला साहाय्य करण्याचे कार्य भाषा करीत असते." असे विचार शिरवाडकरांनी १९५६ मध्ये द्वैभाषिक राज्य तोंडावर आलेले असताना मांडलेले आहेत. त्याकडे नीट लक्ष दिले की शिरवाडकर भाषेबाबत केवळ प्रादेशिक सांस्कृतिक वा ऐतिहासिक अभिमानाची भूमिका घेत नसून भाषाविषयक मूल्यविचारांचाच पाठपुरावा करतात हे जाणवते.

नाशिक येथे 'उर्दू भाषा वर्गा'चे उद्घाटन करतानाही शिरवाडकरांनी परभाषा अध्ययनातून "राष्ट्रीय एकात्मतेचे उद्दिष्ट सफल" होण्याची शक्यताच बोलून दाखविली आहे.[६] शिरवाडकरांचा एकूण भाषाविचार अशा रीतीने लोकशाही समाजरचनेचा पाठपुरावा करणारा आहे. संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेचा प्रश्न असो, 'अंग्रेजी हटाओ'चे आंदोलन असो, राष्ट्रभाषा हिंदीचा वाद असो, 'मराठी अन्याय निर्मूलना'ची बाब असो किंवा उर्दू भाषा अध्ययनाची गोष्ट असो शिरवाडकर जे विचार मांडतात ते व्यक्ती, समाज, राष्ट्र, आणि भाषा यांच्या मूळ नात्याचा विचार करून आणि लोकशाही समाजरचनेत भाषा या संस्थेचे स्थान व कार्य लक्षात घेऊनच. त्यामुळेच शिरवाडकरांनी मांडलेल्या भाषाविचाराचे महत्त्व आहे ते एका सर्जनशील साहित्यिकाने मांडलेला भाषाविचार म्हणून नव्हे तर एका दक्ष नागरिकाने मांडलेले तळमळीचे विचार म्हणून.

## टीपा

१. वि. वा. शिरवाडकरांनी खालील भाषणात आणि लेखांत व्यक्त केलेल्या भाषा विषयक विचारांच्या आधारे वरील लेख लिहिलेला आहे :

( क ) " **अंग्रेजी हटाओ का ?** " ( शिरवाडकर आणि इतर ), अंग्रेजी हटाओ संमेलन प्रकाशन, नाशिक पुणे १९५९.

( ख ) " हिंदी भाषेचा वाद ", **सत्यकथा** मे, १९६५

( ग ) " मराठी अन्याय निर्मूलनविषयक विचार, " **महाराष्ट्र टाइम्स** मुंबई, दिनांक २३ ऑक्टोबर १९७७.

( घ ) **मराठी साहित्य संमेलन—अध्यक्षीय भाषण**—मडगाव ( गोवे ) १९६४, पृ. ५–१२.

वरील लेखांतील व भाषणातील संदर्भ प्रस्तुत लेखात पुनःपुन्हा आलेले असल्याने ते स्वतंत्रपणे नोंदविलेले नाहीत. मात्र हे सर्व संदर्भ अवतरणात दिलेले आहेत.

२. विकास योजना, देशापुढील प्रश्न इत्यादी गोष्टींचा बागुलबोवा पुढे करून भाषाविषयक प्रश्न डावलण्याचा राजकारणी लोकांचा प्रयत्न होता असे जे शिरवाडकर म्हणतात त्याला दुजोरा देणारा संदर्भ असा :

" The supporters of linguistic provinces were furious because the Dar Commission concluded that the formation of provinces on exclusively or even mainly linguistic considerations was not in the larger interests of the Indian nation and should not be taken in hand. It reminded the people that there were more urgent problems pertaining to defence, inflation, refugees, food etc. " ( Y. D. Phadke, " Preface ", **Politics and language**, Bombay, 1979, p. vii )

३. ना. गो. कालेलकर, " भारतीय भाषा : नव्या जबाबदाऱ्या," **भाषा : अंतसूत्र आणि व्यवहार** ( संपा. मु. ग. पानसे ), पुणे, १९६९, पृ. २

४. प्रभाकर पाध्ये, " हिंदी भाषेचा वाद ", **सत्यकथा** मार्च १९६५, पृ. १०-१४

५. मराठीकरणाच्या बाबतीत विद्यापीठे परिभाषेची अडचण सांगून गप्प कशी बसतात याचे एक उदाहरण येथे नमूद करता येण्यासारखे आहे. २५ व २६ फेब्रुवारी १९६६ रोजी पुणे विद्यापीठ कोर्टाच्या बैठकीत सदस्य श्री. वि. अ. पटवर्धन यांनी विद्यापीठ कामकाजाच्या मराठीकरणाबाबत प्रश्न विचारला होता. त्याला उत्तर देताना " मुख्य अडचण ' परिभाषा ' आहे असे म्हटले होते. ( पहा, पुणे विद्यापीठ कोर्ट मीटिंग प्रोसीडिंग्ज ( छापील ) क्र. कोर्ट २५।२६–२–१९६६, पृ. ३६ .)





अनुक्रमणिका

६. “इतिहासाच्या शृंखला तुटेपर्यंत विकास उद्दिष्ट साधणार नाही.” **महाराष्ट्र टाइम्स** मुंबई दि. ६–१–१९७६, पृ. ३ (वृत्तविशेष)

**मराठी विभाग, मॉडर्न कॉलेज, पुणे ४११००५**

[अशा प्रकारे इतरांच्याही भाषाविचारांचे संकलन आणि विवरण होणे जरूर आहे. ह्या दिशेने पूर्वी झालेले दोन प्रयत्न म्हणजे––

अशोक रा. केळकर, श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचा भाषाविचार, महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका, अंक १७८. ५९–६२, १९७१.

अशोक रा. केळकर, शब्दवेध : श्रीपाद कृष्ण कोल्हटकर आणि प्रतिशब्दांचा शोध, महाराष्ट्र–साहित्य–पत्रिका, अंक १७८ ५४–८ १९७१.

अशोक रा. केळकर, न. चिं. केळकर आणि मराठी भाषा, समावेश केळकर, पुणे केसरी प्रकाशन, १९७२, पृ. १९२–२०२, विशेषतः छेदक २ केळकरांचा भाषाविचार.

पत्रिकेच्या वाचकांनी अशा प्रकारच्या इतर प्रयत्नांचे संदर्भ आणि इतरांच्या भाषाविचारांचे संकलन आणि विवरण करणारे लेख अवश्य पाठवावे.–संपादक]

**वेषभाषा**

माझे एक स्नेही आहेत डॉ. रा. कृ. गाडगीळ. आमचा दोघांचा बराच लोभ. डॉक्टरना संशोधनाबद्दल एक मोठा मान मिळाला. म्हणून त्यांचा सत्कार व्हायचा होता. मुंबईतले झाडून सगळे लहानमोठे डॉक्टर सभेला जमले. मुख्य पाहुणे होते सुप्रीम कोर्टाचे माजी मुख्य न्यायाधीश कै. गजेंद्रगडकर. श्रोते, वक्ते, अध्यक्ष, मुख्य पाहुणे सगळे कडक इस्त्रीच्या सुटाबुटात. सगळयांची भाषणे इंग्रजीत. पाच-सहा वक्त्यानंतर हा बोलायला उभा राहिला. त्या वेळी हा नेहमी एरव्ही इंग्रजी पोषाखात वावरे. पण सभेच्या वेळी याचे कोट, धोतर, आणि पायात कोकणी वाहणा! सुरवातीला त्या कडक इस्त्रीच्या व्यासपीठावर याचा गावठी वेष बघून श्रोते बुचकळयात पडले. याची चारपाच वाक्ये झाल्यावर समोरच्या रांगेवर बसलेल्या एक डॉक्टरीणबाई भानावर आल्या आणि एकदम बोलून गेल्या, “अगबाई, हा इंग्रजीत बोलतो आहे!” मग याचे भाषण सगळयांना प्रत्यक्ष झाले त्यापेक्षा फार झकास वाटले!

**विश्राम बेडेकर यांनी सांगितलेली आठवण** (त्यांच्याच शब्दात)

# भाषाप्रभुत्व

## दि. के. बेडेकर

आपण सर्वजण साधारणपणे असे मानतो की, मायबोलीवर आपले प्रभुत्व असते. ही आत्मविश्वासाची भावना असते म्हणूनच न विचारता व न अडखळता आपण मायबोलीत राहतो. परक्या व शिकून आलेल्या भाषेवरही आपल्याला प्रभुत्व आहे, ही भावना भार थोड्या माणसांतच आढळते. कामचलाऊ इंग्रजी आपल्याला येते असे साधारण इंग्रजी शिकलेला माणूस मानतो. या बाबतीतही जास्त धिटाईचा आत्मविश्वास काहीजणांना असतो. पण तो फाजिल आत्मविश्वास आहे, हे इतरांना कळून येते. जी गत इंग्रजीची तीच संस्कृत, हिंदी इत्यादी भाषांची.

मायबोलीपुरता आपला आत्मविश्वास असतो, तो एकंदर बोलण्याचा व्यवहार चालता ठेवण्याला उपयोगी असतो. पण त्यात खरी गोम अशी आहे की आपण मायबोली इतक्या लहानपणी शिकतो व इतक्या विनायास शिकतो की, मायबोली उत्तम कळते का नाही याची खरी कसोटी कधी लागतच नाही.

ती कसोटी कधीकधी गंमतीदार तऱ्हेने लागते. परवा माझी नात एक गोष्ट सांगत होती. आठ वर्षे वयाच्या मुलीला गोष्ट सांगताना दोन अवधाने सांभाळावी लागतात. एक भाषेचे व दुसरे गोष्टीच्या 'कथानकाचे'. ही दोन अवधाने सांभाळत गोष्ट सांगणे ही भलतीच अवघड व म्हणून नातीला आवडणारी बाब आहे. यात तिला यश मिळते का ? मुळीच नाही. गोष्टीच्या तुकड्यांचा क्रम बिनसतो, तिसऱ्याच गोष्टीतला तुकडा या गोष्टीत येऊन गडबड करतो. सगळी फजिती होते. आणि यातच नातीला कधी गंमत वाटते, कधी आश्चर्यही.

अशीच एक गोष्ट सांगताना गोष्टीतल्या म्हातारीची बाघोबाला पाहून घाबरगुंडी उडाली. गोष्ट सांगणे म्हणजे नुसते तोंडाने सांगणे हे नातीला मान्य नाही. शब्दांबरोबर योग्य ते हावभाव करणे आवश्यक असते. त्याशिवाय शब्दांना अर्थ लाभणार कसा ? या नियमानुसार नातीने उभे राहून म्हटले, 'घाबरगुंडी उडाली' आणि हात उंच करून उडी मारली.

आता, त्या उडीबरोबर एक विलक्षण कल्पना तिच्या मनात आली. नात मला





अनुक्रमणिका

६. " इतिहासाच्या शृंखला तुटेपर्यंत विकास उद्दिष्ट साधणार नाही." **महाराष्ट्र टाइम्स** मुंबई दि. ६–१–१९७६, पृ. ३ ( वृत्तविशेष )

**मराठी विभाग, मॉडर्न कॉलेज, पुणे ४११००५**

[ अशा प्रकारे इतरांच्याही भाषाविचारांचे संकलन आणि विवरण होणे जरूर आहे. ह्या दिशेने पूर्वी झालेले दोन प्रयत्न म्हणजे––

अशोक रा. केळकर, श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचा भाषाविचार, महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका, अंक १७८. ५९–६२, १९७१.

अशोक रा. केळकर, शब्दवेध : श्रीपाद कृष्ण कोल्हटकर आणि प्रतिशब्दांचा शोध, महाराष्ट्र–साहित्य–पत्रिका, अंक १७८ ५४–८ १९७१.

अशोक रा. केळकर, न. चिं. केळकर आणि मराठी भाषा, समावेश केळकर, पुणे केसरी प्रकाशन, १९७२, पृ. १९२–२०२, विशेषतः छेदक २ केळकरांचा भाषाविचार.

पत्रिकेच्या वाचकांनी अशा प्रकारच्या इतर प्रयत्नांचे संदर्भ आणि इतरांच्या भाषाविचारांचे संकलन आणि विवरण करणारे लेख अवश्य पाठवावे.–संपादक ]

**वेषभाषा**

माझे एक स्नेही आहेत डॉ. रा. कृ. गाडगीळ. आमचा दोघांचा बराच लोभ. डॉक्टरना संशोधनाबद्दल एक मोठा मान मिळाला. म्हणून त्यांचा सत्कार व्हायचा होता. मुंबईतले झाडून सगळे लहानमोठे डॉक्टर सभेला जमले. मुख्य पाहुणे होते सुप्रीम कोर्टाचे माजी मुख्य न्यायाधीश कै. गजेंद्रगडकर. श्रोते, वक्ते, अध्यक्ष, मुख्य पाहुणे सगळे कडक इस्त्रीच्या सुटाबुटात. सगळ्यांची भाषणे इंग्रजीत. पाच-सहा वक्त्यानंतर हा बोलायला उभा राहिला. त्या वेळी हा नेहमी एरव्ही इंग्रजी पोषाखात वावरे. पण सभेच्या वेळी याचे कोट, धोतर, आणि पायात कोकणी वाहणा! सुरवातीला त्या कडक इस्त्रीच्या व्यासपीठावर याचा गावठी वेष बघून श्रोते बुचकळ्यात पडले. याची चारपाच वाक्ये झाल्यावर समोरच्या रांगेवर बसलेल्या एक डॉक्टरीणबाई भानावर आल्या आणि एकदम बोलून गेल्या, " अगबाई, हा इंग्रजीत बोलतो आहे ! " मग याचे भाषण सगळ्यांना प्रत्यक्ष झाले त्यापेक्षा फार झकास वाटले !

**विश्राम बेडेकर यांनी सांगितलेली आठवण** ( त्यांच्याच शब्दात )

# भाषाप्रभुत्व

## दि. के. बेडेकर

आपण सर्वजण साधारणपणे असे मानतो की, मायबोलीवर आपले प्रभुत्व असते. ही आत्मविश्वासाची भावना असते म्हणूनच न विचारता व न अडखळता आपण मायबोलीत राहतो. परक्या व शिकून आलेल्या भाषेवरही आपल्याला प्रभुत्व आहे, ही भावना भार थोड्या माणसांतच आढळते. कामचलाऊ इंग्रजी आपल्याला येते असे साधारण इंग्रजी शिकलेला माणूस मानतो. या बाबतीतही जास्त धिटाईचा आत्मविश्वास काहीजणांना असतो. पण तो फाजिल आत्मविश्वास आहे, हे इतरांना कळून येते. जी गत इंग्रजीची तीच संस्कृत, हिंदी इत्यादी भाषांची.

मायबोलीपुरता आपला आत्मविश्वास असतो, तो एकंदर बोलण्याचा व्यवहार चालता ठेवण्याला उपयोगी असतो. पण त्यात खरी गोम अशी आहे की आपण मायबोली इतक्या लहानपणी शिकतो व इतक्या विनायास शिकतो की, मायबोली उत्तम कळते का नाही याची खरी कसोटी कधी लागतच नाही.

ती कसोटी कधीकधी गंमतीदार तऱ्हेने लागते. परवा माझी नात एक गोष्ट सांगत होती. आठ वर्षं वयाच्या मुलीला गोष्ट सांगताना दोन अवधाने सांभाळावी लागतात. एक भाषेचे व दुसरे गोष्टीच्या 'कथानकाचे'. ही दोन अवधाने सांभाळत गोष्ट सांगणे ही भलतीच अवघड व म्हणून नातीला आवडणारी बाब आहे. यात तिला यश मिळते का ? मुळीच नाही. गोष्टीच्या तुकड्यांचा क्रम बिनसतो, तिसऱ्याच गोष्टीतला तुकडा या गोष्टीत येऊन गडबड करतो. सगळी फजिती होते. आणि यातच नातीला कधी गंमत वाटते, कधी आश्चर्यही.

अशीच एक गोष्ट सांगताना गोष्टीतल्या म्हातारीची वाघोबाला पाहून घाबरगुंडी उडाली. गोष्ट सांगणे म्हणजे नुसते तोंडाने सांगणे हे नातीला मान्य नाही. शब्दां-बरोबर योग्य ते हावभाव करणे आवश्यक असते. त्याशिवाय शब्दांना अर्थ लाभणार कसा ? या नियमानुसार नातीने उभे राहून म्हटले, 'घाबरगुंडी उडाली' आणि हात उंच करून उडी मारली.

आता, त्या उडीबरोबर एक विलक्षण कल्पना तिच्या मनात आली. नात मला





अनुक्रमणिका

म्हणाली, ‘ म्हातारीची घाबरगुंडी आकाशात उंच उडाली.’ आणि मग ती मला विचारते, ‘ घाबरगुंडी उडते•कशी ? तिला पंख असतात ? ”

माझ्यासमोर मोठा पेच पडला. गोष्ट अडून पडलेली. घाबरगुंडी उडते कशी ? याचे उत्तर मला ठाऊक नव्हते आणि म्हातारीची ‘ घाबरगुंडी ’ म्हणजे तरी काय ?

माझ्या मराठी मायबोलीतल्या या शब्दाचे माझे ज्ञान इतके थोडे होते याची कल्पना मला नातीने आणून दिली.

आणखी असाच एक प्रसंग. नातीने एक लोकलगाडी दुरून पाहिली व तिला मोठी गंमत वाटली. घरी आल्यावर ती सांगत होती, ‘ आम्ही पुलाखालून जाणारी झुकझुक गाडी पाहिली. खूप लांब होती आणि लचक होती. लांबलचक होती.’

तिला गाडीची लांबी मोहक वाटली होती. ती वर्णन करायला शब्द कोणता ? ‘ लांबलचक ’ हा शब्द तिने ऐकलेला होता. ‘ लांब ’ हा शब्द तिने अनेकदा वापरला होता. तिने अगदी सहजपणे ‘ लांबलचक’चे दोन तुकडे केले. ‘ लांब ’चा अर्थ तिला माहीत होता. ‘ लचक ’चा अर्थ तिला माहीत नव्हता, पण दोन तुकडे मिळून होणारा शब्द ‘ खूप लांब ’ असलेल्या गाडीला समर्पक आहे असे तिने ठरवले. का तिला असे वाटले की ‘ लांबलचक ’ गाडी म्हणजे वळणे घेत, लचकत जाणारी लांब गाडी ?

मला ते कोडे आहे. ‘ लांबलचक ’ या शब्दाचे गुपित मला कळत नाही. हा मराठी शब्द. पण मला तो नीट उमगत नाही व तरी मी तो धडाकून वापरत आलो आहे.

परवा एक मित्र मला म्हणाले, ‘ हुंडा घेणे ही व्यवहाराची बाब आहे, ती काही चालरीत नाही. वाईट चालरीती, रूढी व समजुती सोडाव्या हे ठीक. पण व्यवहाराच्या बाबतीत वाईट-चांगले नसते.’ यावर आमचे काय बोलणे झाले त्याला महत्त्व नाही. पण या संवादात मला प्रथम कळले की ‘ चाली ’ व ‘ रीती ’ या दोन शब्दांना वेगवेगळे अर्थ आहेत, आणि ‘ चालरीत ’ या जोडशब्दाने एखाद्या घराण्याची किंवा लोकसमूहाची संस्कृती आपण निर्देशित करत असतो. ‘ चाली ’ या सवयीसारख्या असतात, रूढी असतात. रूढ रुळलेल्या गाडीवाटेने गाडी चाललेली असते व गाडीवान झोपलेला असतो, तसा समूहाच्या चालींचा प्रकार असतो. चालींना वाईट-चांगल्या ठरविणारा माणूस एका अर्थी ‘ बाहेरचा ’ असतो. ( इंग्रजी शिकलेले सुधारक चालींवर टीका करू लागले. ते ‘ बाहेरचे ’ म्हणून त्यांना समाजाने ‘ बहिष्कृत ’ ठरवले. )

‘ रीती ’ या आंधळया नसतात. समजून उमजून पाळले जाणारे शिष्टाचार, पद्धती किंवा वागण्याचे नियम म्हणजे रीती. ‘ रीतीने ’ वागणे ही अभिमानाची बाब असते. ‘ रीतीने ’ बोलणे हा शिकवणीचा, संस्काराचा भाग असतो. आपल्या सामूहिक वर्तनात अमुक ‘ चाली ’ वाईट आहेत असे समूह कधी कबूल करतोही, पण अमुक ‘ रीत ’ वाईट आहे असे समूहाला वाटत नसावे.

पण ‘ चाल ’ व ‘ रीत ’ यात हा भेद मला वाटला तरी तो आहेच अशी माझी खात्री नाही. माझे मायबोलीवर प्रभुत्व आहे, असा मला आत्मविश्वास नाही. पदोपदी हे जाणवायला हवे. पण आपण पदोपदी जगतो ते अलगद, उथळ जगतो. खोल जगण्याची वेळ आमरण येत नाही. हीच जगण्यातली विचित्र सोय आहे.

**पूर्व प्रकाशन :** समाज–प्रबोधन–पत्रिका, जुलै–ऑगस्ट १९७३. समावेश : दि. के. बेडेकर, ललितचिंतन, पुणे : मागोवा प्रकाशन, १९८३ पृ. ९–१०. अनुमति-पूर्वक पुनर्मुद्रण.

[ कै. दि. के. बेडेकरांच्या या नवीन संग्रहात भाषाव्यवहाराबद्दल ‘ शपथ ’, ‘ अपशब्द ’, ‘ घोषणा ’ अशी इतरही वाचण्यासारखी टिपणे आहेत. ‘ भाषाप्रभुत्व ’ हे टिपण वाचताना आपल्या मातृभाषेच्या ज्ञानाची कसोटी अशी कधी लागल्याचे क्षण वाचकांना आठवले का ? वाचकांनी अशा प्रकारच्या प्रचीतीच्या नोंदी करून अवश्य पाठवाव्या—संपादक ]

**भाषाशुद्धी**

अमेरिकेतले ॲफ्रिकन लोक आग्रहाने आपल्याला ‘ ब्लॅक्स ’ म्हणवून घेतात. त्यापूर्वी ‘ ॲफ्रो-अमेरिकन ’ शब्दाची सद्दी काही दिवस चालली. त्याच्याही अगोदर ‘ नीग्रो ’ म्हणवून घेणे त्यांना पसंत होते. ‘ कलर्ड पीपल ’ हा आधीचा शब्द त्यांना इतका पसंत नव्हता–जो ‘ डार्कीज ’ या शब्दापेक्षा जरा बरा म्हणून रूढ झाला होता. ‘ डार्कीज ’ शब्दाच्यापूर्वी कोणता शब्द चालायचा म्हणून विचारता ? ‘ ब्लॅक्स ’ ! ( आपणही त्यांना हल्ली ‘ काळे लोक ’ न म्हणता ‘ कृष्णवर्णीय लोक ’ म्हणतो ! )

---

**लेखकांसाठी सूचना**

मुद्रणप्रत हस्तलिखित किंवा टंकलिखित असो पण सुवाच्य व पानाच्या एकाच बाजूला असावी. ओळीमध्ये आणि पानाच्या चारी बाजूंना व्यवस्थित अंतर असू द्या. निर्णय एक महिन्यात कळवला जाईल. अस्वीकृत लेखन पुरेसे टपालहशील पाठवल्यास परत केले जाईल. अनावश्यक पत्रव्यवहार टाळावा अशी लेखकांना नम्र विनंती. परीक्षणे लिहू इच्छिणाऱ्यांनी संपर्क साधावा.

आधारभूत संदर्भ लेखक, शीर्षक, उगम, प्रकाशनस्थळ, प्रकाशक, प्रकाशनवर्ष असा पुरा द्यावा म्हणजे जिज्ञासू वाचकांची सोय होईल. लेखाची शब्दमर्यादा ५००० शब्दांपर्यंत ठेवावी. जर तेवढ्या मर्यादेत विषयाला न्याय मिळणार नाही असे वाटले तरच त्या शब्दमर्यादेत बसतील असे दोन किंवा तीन लेखांक पाडून लेख पाठवावा. लेखाची भाषा शक्य तो सोपी आणि नेमकी असावी, सैद्धांतिक चर्चा असेल तिथे परिचयातील उदाहरणे द्यावी, पारिभाषिक संज्ञा वापरल्या तर त्यांचा अर्थ सोप्या शब्दांत उलगडून द्यावा, केवळ कंसात इंग्रजी प्रतिशब्द देणे पुरेसे मानू नये. ( पत्रिकेच्या सर्वच वाचकांना इंग्रजी येते असे नाही. )

ज्याची त्याची प्रचीती

# भाषेचा अडसर

## अच्युत रामचंद्र भांबुरे

मातृभाषेत स्वतःचे विचार मांडणे जेवढे सोपे असते तेवढे परक्या भाषेत शक्य होत नाही.

असे असताही केवळ इंग्रजी भाषेतूनच स्वसंशोधित ऑटोस्टार्टचे विवेचन करावयाचे असलेने शक्ती, वेळ व्यर्थ गेला. भाषेच्या अडचणीमुळे स्वतःचे विचार परीक्षकाला समजावून देऊ शकत नव्हतो आणि तो काय म्हणतो ते समजू शकत नव्हतो.

एवढी अडचण दूर झाल्यास अनेक संशोधने प्रकाशात येतील ! पण ? माझा स्वतःचाच अनुभव सांगतो.

शेतावरील इलेक्ट्रिक मोटर-पंप वीज बंद झाल्यानंतर बंद होतात, परंतु वीज पुन्हा आल्यानंतर आपोआप चालू होत नाहीत. पाणी देण्याच्या पिकापासून कित्येक फर्लांग अंतरावर पाणवठा असू शकतो. वीज येणे व बंद होणे हे चालू झाल्यास जाण्या-येण्यातच दिवसच्या दिवस जातो. माणूस कंटाळतो. कित्येक वेळा हा त्रास नको म्हणून शेतकरी स्टार्टरचे बटण कायमचे दाबून ठेवतात आणि परिणाम इलेक्ट्रिक मोटार जळण्यात होतो. ही अडचण लक्षात घेतल्यानंतर मला १९७३ साली एक योजना सुचली. शास्त्रीय पद्धतीने रचना केली आणि ती यशस्वी ठरली. तोच

### आटोस्टार्ट

मोटार-पंप वीज येताच आपोआप सुरू होईल अशी रचना तयार केली. तीन फेजवर मोटार चालते क्वचित प्रसंगी दोन फेज जिवंत असतात आणि त्यावेळी हाताने स्टार्टर सुरू केल्यास सुरू होतो व पुन्हा बंद पडतो. ऑटोस्टार्ट तीन फेज असतील तरच स्टार्टर सुरू करतो व मोटारला वीज पुरवठा करतो ही कल्पनाच नवीन होती.

काही मित्रश्रेष्ठांच्या प्रेमाखातर मी पेटंट मिळविण्यासाठी अर्ज केला. पेटंट मिळणे म्हणजे संशोधित वस्तू नवीनच असल्याचे सिद्ध झालेले सरकारचे दाखलापत्रच. संशोधक ठरल्याची पावती.

पहिले पत्र ऑफिसला पाठविल्यानंतर एक इंग्रजी भाषेतील माहिती-पत्रक आले. स्वतःची भाषेची कुवत कमी पडत होती. त्यातल्या त्यात परंतु माझ्यापेक्षा ज्यांचे प्रभुत्व इंग्रजी भाषेवर आहे, असे मित्र गाठले. त्यांना मराठीतून समजावून द्यायचे व त्यांचे कडून इंग्रजी करून घ्यायचे असे करीतकरीत फॉर्म्स भरून पाठविले. तपासणी सुरू झाली. परीक्षकांना मुंबईस जाऊन भेटलो. त्यांना मराठी समजत नव्हते. हिंदी

चांगल्या प्रकारे जाणू शकत नव्हते. आमची पंचाईत! तीन-चार फेऱ्या मारल्या. कित्येक दिवस लिहून घेण्यात पुन्हा पाठविण्यात, भेटण्यात घालविले पण परकीय भाषेच्या माध्यमाने मी माझे म्हणणे प्रकर्षाने मांडू शकत नव्हतो. अशी चार वर्षे गेली. एक दिवस पेटंट ऑफिसच्या परीक्षकांना सरळ विचारले, इतके दिवस तुम्ही पाहाता, तपासता, पण मला निश्चित सांगा की याला पेटंट मिळेल किंवा नाही? त्यांनी पेटंट मिळण्याची खात्री दिली व पेटंट ऑफिसकडे वकिली करणाऱ्याकडून काम करून घ्यायचा सल्ला दिला.

असं सरळ विचारायचं एक कारण होतं ते म्हणजे माझी आर्थिक स्थिती अतिशय नाजूक होती, आणि आहेही.

नंतर भाटे–पोंक्षे या कंपनीमार्फत पेटंटचा अर्ज दुरुस्त करून सादर केला. आणि आश्चर्य म्हणजे पेटंट मिळाले

१९७३ ते १९७९ असा काळ यासाठी घालवावा लागला. मातृभाषा जर परीक्षकांची भाषा असती तर एवढा वेळ गेला नसता. पण—किंवा माझी मातृभाषा तरी इंग्रजी पाहिजे होती.

शास्त्र असो, भाषा असो, अथवा अनुभव असो, स्पष्ट करताना, दुसऱ्याला सांगताना त्याची अनुभूती इतरांना देताना मातृभाषा जास्त उपयोगी ठरते.

पण राजभाषा इंग्रजी व हिंदी असल्याने आणि त्यातल्या त्यात हिंदीपेक्षाही इंग्रजीच जास्त प्रमाणात वापरली जात असल्याने नाइलाजाने ती जाणणाऱ्यांचे मध्यस्थपण घेतल्याशिवाय पुढं जाताच येत नाही.

मातृभाषेतूनच नवीन संशोधित बाब प्रदर्शनीय करावयाची असेल तर अनेक व्यक्तींना संशोधक ठरता येईल. अनेक व्यक्ती स्वज्ञानाचे दालन इतरांसाठी उघडे करतील पण!

**द्वारा : राजमहेंद्र इलेक्ट्रॉनिक्स, रविवार पेठ, फलटण ४१५५२३**

## सरकारी नियमांचा मराठी अनुवाद : पडताळा पाहू

**गीता सुभाष भागवत**

सरकारी नोकरांच्या नोकरीविषयक नियमांतील एक मूळ इंग्रजी नियम आणि नंतर त्याचा दोन प्रकारे केलेला अनुवाद इथे दिला आहे. पहिला अनुवाद एका वाक्याला एक वाक्य अशा रीतीने केला आहे तर दुसरा अनुवाद करताना मूळ इंग्रजी वाक्याची दोन स्वतंत्र वाक्ये केली आहेत. नियमाचा काटेकोरपणा अनुवादामुळे ढळता कामा नये हे लक्षात घेऊन कोणता अनुवाद योग्य वाटतो? दुसऱ्या अनुवादात काटेकोरपणा ढळला आहे का? भाषेचा डौल राखला गेला आहे का? नियम लागू करणारी मंडळी आणि नियम ज्यांना लागू होतो ती मंडळी यांना याबद्दल काय वाटते हे जाणून घेणे महत्त्वाचे आहे. नियमांचे अनुवाद कोणत्या धोरणाने करायचे

हे ठरवण्यासाठी अशा पडताळ्यांची खचित मदत होईल.

**मूळ इंग्रजी नियम**

( 1 ) Where a Government servant completes

( a ) twenty years service—if he is a Gazetted Officer and ( b ) twentyfive years service if he is a Non-gazetted servant, the Audit Officer in the case of a Gazetted Offirer or the Head of Office in Consultation with the Audit Officer in the case of a Non-gazetted Government servant shall, in accordance with the rules for the time being in force, verify the service rendercd by such a Government servant, determine the qualifying service and communicate to him in Form 22 the period of qualifying service so determined.

**मराठी अनुवाद** ( पहिला )

( १ ) शासकीय कर्मचाऱ्याची,

( क ) तो राजपत्रित अधिकारी असल्यास वीस वर्षांची सेवा पूर्ण झाल्यावर

( ख ) तो अराजपत्रित कर्मचारी असल्यास पंचवीस वर्षांची सेवा पूर्ण झाल्यावर

राजपत्रित अधिकाऱ्याच्या बाबतीत लेखापरीक्षा अधिकारी किंवा अराजपत्रित शासकीय कर्मचाऱ्याच्या बाबतीत लेखापरीक्षा अधिकाऱ्याच्या विचारविनिमयाने कार्यालय प्रमुख, त्यावेळी अंमलात असलेल्या नियमांच्या अनुसार, अशा शासकीय कर्मचाऱ्याने केलेल्या सेवेची पडताळणी करील, त्याची अर्हकारी सेवा निर्धारित करील आणि अशा प्रकारे निर्धारित केलेल्या अर्हकारी सेवेचा कालावधी नमुना २२ मध्ये त्याला कळवील.

**मराठी अनुवाद** ( दुसरा )

( १ ) शासकीय कर्मचाऱ्याची ठराविक वर्षांची सेवा पूर्ण झाल्यानंतर, त्याने केलेल्या सेवेची पडताळणी, त्यावेळी अंमलात असलेल्या नियमांनुसार करण्यात येईल, त्याची अर्हकारी सेवा निर्धारित करण्यात येईल आणि अशा रीतीने निर्धारित केलेला अर्हकारी सेवेचा कालावधी नमुना २२ मध्ये त्याला कळवण्यात येईल. ही कार्यवाही राजपत्रित अधिकाऱ्याच्या बाबतीत त्याची वीस वर्षांची सेवा पूर्ण झाल्यानंतर लेखा-परीक्षा अधिकारी करील व अराजपत्रित कर्मचाऱ्याच्या बाबतीत त्याची पंचवीस वर्षांची सेवा पूर्ण झाल्यानंतर लेखापरीक्षा अधिकाऱ्याशी विचारविनिमय करून कार्यालय प्रमुख करील.

**द्वारा : भाषासंचालनालय, नवीन प्रशासन भवन, १४ वा मजला, मंत्रालया-समोर मुंबई ४०००३२**

**[ वाचकांनी आपल्या प्रतिक्रिया जरूर कळवाव्या.—संपादक. ]**





अनुक्रमणिका

**व्युत्पत्ती हव्या आहेत**

पुढील शब्दांच्या व्युत्पत्ती जिज्ञासूंना पाहिजे आहेत.
( १ ) वल्गुते ( २ ) बंगी—पार्सल या अर्थी.

**शब्द हवे आहेत**

( १ ) मृत व्यक्तीच्या नावाच्या मागे ‘ श्रीयुत ’ सारखे पद न लावता ‘ कैलास-वासी ’, ‘ वैकुंठवासी ’, ‘ मर्हूम ’ ( अरबी : ज्याच्यावर कृपा झाली आहे असा ) असे काही परंपरेने आलेले शब्द लावतात. ‘ पैगंबरवासी ’, ‘ ख्रिस्तवासी ’, ‘ परलोक वासी ’, ‘ स्वर्गवासी ’ असेही काही शब्द बनवण्यात आले आहेत. हिंदीच्या अनुकरणाने ‘ स्वर्गीय ’ असा अर्थाच्या दृष्टीने खटकणारा शब्दही वापरात आहे. नास्तिक माणसाने किंवा नास्तिक माणसाबद्दल काय वापरावे हा एक प्रश्न आहेच. सरसकट सर्व व्यक्तींच्या नावामागे लावता येईल असा एखादा शब्द मिळाला तर ते सोयीचे होईलच ( मृत व्यक्ती वैष्णव होती का नव्हती याची माहिती नसली तर ? ), पण सामाजिक धारणेच्या दृष्टीने उचितही होईल ( धर्मभेद कुठपर्यंत मनात वागवायचे ? ) असे वाटते.

( २ ) मराठी सुशिक्षित माणूस ‘ त्याच्या बोलण्यावागण्यावर सगळ्यांच्या कॉमेंटस् कॉमेंट्री/कॉमेंटा चालल्या होत्या ’ अशा प्रकारचे वाक्य सहज बोलून जातो. या ठिकाणी शेरा किंवा अभिप्राय या शब्दांनी भागणार नाही असे वाटते. **शासन व्यवहार कोशा** मधला ‘ कॉमेंट ’साठी दिलेला प्रतिशब्द रोजच्या व्यवहारात रुळेल असे वाटत नाही. कॉमेंट शब्दच वापरत राहाणे हा एक पर्याय आहे, पण काहीशा औप-चारिक भाषाव्यवहारात ते खपवून घेतले जाणार नाही.

---



---





अनुक्रमणिका

## पत्रिकेबद्दलचे वार्षिक निवेदन

'मराठी–अभ्यास–परिषद–पत्रिका' या नियतकालिकाची मालकी आणि इतर बाबी यांच्यासंबंधी निवेदन (वृत्तपत्रे आणि पुस्तके–नोंदणी अधिनियम, कलम १९ डी (बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली १९५६, नियम ८ नमुना ४ यांना अनुसरून फेब्रुवारी संपल्यानंतर प्रकाशित झालेल्या पहिल्या अंकात द्यायचे असते ते)

१. प्रकाशनस्थळ : पुणे, महाराष्ट्र

२. प्रकाशन कालनियतता : त्रैमासिक—जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर महिन्यात.

३. मुद्रकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : चिं. स. लाटकर, भारतीय, कल्पना मुद्रणालय, पुणे ४११०३०.

४. प्रकाशकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : प्रभाकर नारायण परांजपे, भारतीय, चिटणीस, मराठी–अभ्यास–परिषद, १/८ आगरकरनगर, पुणे ४११००१.

५. संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : अशोक रामचंद्र केळकर, भारतीय, ए–२ परिमल, १२३९–ए आपटे रस्ता, पुणे ४११००४.

६. पत्रिकेच्या मालकाचे नाव आणि पत्ता : मराठी-अभ्यास-परिषद, १/८ आगरकरनगर, पुणे ४११००१.

मी, प्रभाकर नारायण परांजपे, असे प्रतिज्ञापूर्वक सांगतो की वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

**प्रभाकर नारायण परांजपे**
प्रकाशक

पुणे १ जुलै १९८३

---



---

# परिषद्-वार्ता

( १ जानेवारी १९८२ ते ३१ जुलै १९८३ पर्यंत )

## मराठी–अभ्यास–परिषदेची स्थापना

स्वातंत्र्य मिळाल्यानंतर ( विशेषतः भाषावार राज्यरचना झाल्यानंतर ) नवा समाज बनवण्याच्या कार्याचे एक प्रभावी साधन म्हणून भारतातील प्रादेशिक भाषा उपयोगात येतील अशी अपेक्षा होती. प्रशासन, न्यायालये, शिक्षण ज्ञान व मूल्ये यांचा प्रसार उद्योगधंदे, आणि तंत्रविज्ञान ह्या सर्व क्षेत्रांमध्ये प्रादेशिक भाषा वापरल्या जातील आणि त्यामुळे लोकव्यवहार, माहितीचे वितरण, आणि विचारांची देवाणघेवाण अधिक सोप्या रीतीने होईल असा विश्वास आपल्याला वाटत होता. पण तो विश्वास बऱ्याच अंशी फोल ठरला आहे. मराठीपुरते बोलायचे झाले तर असे दिसते की निरनिराळ्या क्षेत्रांत मराठीचा वापर पाहिजे तितका होत नाही. आणि ज्या ठिकाणी तो होतो त्या ठिकाणी मराठी भाषा पुरेशी अर्थवाही ठरत आहे, जास्तीतजास्त लोकांना सामावून घेत आहे, असे दिसत नाही. शिक्षणाच्या क्षेत्रात तर मराठीची पिछेहाटच होत आहे. महाराष्ट्रातील विद्यापीठांचे कार्यही या दृष्टीने समाधानकारक आहे, असे म्हणता येणार नाही.

तरी परिस्थिती सर्वस्वी निराशाजनक आहे असे नाही. मराठीचा अभ्यास व संशोधन करण्याचे विधायक काम वेगवेगळ्या क्षेत्रांमधील अनेक व्यक्ती आणि संस्था आपापल्या जागी करीत आहेत. ते सर्व प्रयत्न परस्परपूरक होण्यासाठी अशा व्यक्ती एकत्र आणणारे व्यासपीठ निर्माण करण्याची आणि नियोजनपूर्वक नवीन कामे सुरू करण्याची आज गरज आहे. याच हेतूने **मराठी अभ्यास परिषद** ह्या संस्थेची स्थापना काही समविचारी लोकांनी पुणे येथे १ जानेवारी १९८२ ला केली. मराठी भाषीयांच्या भाषिक गरजा केवळ मराठीपुरत्या मर्यादित नाहीत याची अर्थातच जाणीव ठेवणे जरूरीचे आहे. उदाहरणार्थ, मराठीभाषी मुलामुलींना व्यावहारिक पातळीवरचे बोलीव लेखी इंग्रजी सफाईने आणि आत्मविश्वासपूर्वक कसे वापरता येईल याचा विचार केल्याशिवाय इंग्रजी भाषेबद्दलचे गैरवाजवी आकर्षण कमी करायचा मार्ग सापडणार नाही. मराठी भाषीयांना गरजेपुरत्या इतर भाषा यायला पाहिजेत त्याचप्रमाणे अमराठी लोकांना गरजेपुरती मराठी शिकण्याची योग्य तजवीज होणे जरूर आहे. गरजेपुरती म्हणजे जेवढी कमीअधिक गरज असेल निदान तेवढ्या गरजेपुरती.

परिषदेची उद्दिष्टे ही राहतील : मराठी भाषेची अभिवृद्धी करणे, त्यासाठी पाया-शुद्ध सैद्धांतिक बैठक तयार व्हावी आणि व्यावहारिक पातळीवर अभ्यास व संशोधन व्हावे यासाठी प्रयत्न करणे, आणि निरनिराळ्या क्षेत्रांत मराठीचा वापर वाढावा, परिणामकारक व्हावा यासाठी प्रयत्न करणे. यासाठी मराठी भाषेचे अध्ययन-अध्यापन यात सुधारणा घडवून आणणे, मराठी भाषीयांनी इतर भाषा शिकून त्यांची भाषिक क्षमता आणि अनुभवाचा आवाका वाढवणे, इतर भाषीयांना मराठी शिकवण्याची सोय करणे, भाषिक प्रश्न आणि भाषाव्यवहाराची सुधारणा यांच्याकडे वैज्ञानिक दृष्टीने आणि नियोजनशील वृत्तीने पाहायला शिकणे, या सगळ्या गोष्टींसाठी लोक-जागृती करणे व सरकार, विद्यापीठे यांचे भाषाविषयक प्रश्नांकडे लक्ष वेधणे या गोष्टींकडे परिषद लक्ष पुरवील.

ही उद्दिष्टे साध्य करण्यासाठी परिषद पुढील कार्यक्रम राबवील :

( १ ) व्याख्याने, परिसंवाद, आणि चर्चासत्रे आयोजित करणे.

( २ ) नियतकालिक ( त्रैमासिक ) चालविणे.

( ३ ) मराठी आणि अन्य भाषांसंबंधी पुस्तके/पुस्तिका प्रकाशित करणे.

( ४ ) भाषांचे वर्ग चालविणे.

( ५ ) भाषा-अध्यापनाचे प्रशिक्षण देणे.

( ६ ) भाषिक प्रश्नांकडे आणि भाषा व्यवहारांकडे पाहण्याच्या वैज्ञानिक दृष्टीचा प्रसार होईल असे कार्यक्रम हाती घेणे.

( ७ )पाठ्यक्रम आणि पाठ्यपुस्तकांचे मूल्यमापन करणे.

( ८ ) अनौपचारिक आणि प्रौढ शिक्षणाच्या कार्यक्रमसंबंधातील भाषाविषयक प्रश्न सोडविणे.

( ९ ) भाषांसंबंधी संशोधन करणे.

( १० ) भाषांतर कसे करावे याचे प्रशिक्षण देणे आणि चांगली भाषांतरे करून घेणे.

( ११ ) आधुनिक तंत्र-विज्ञानाच्या क्षेत्रामध्ये ( उदाहरणार्थ गणकयंत्र ) उत्पन्न होणारे भाषाविषयक आणि लिपिविषयक प्रश्न सोडविणे.

## परिषदेशी संपर्क आणि सहकार्य

परिषदेची वर्गणी पुढीलप्रमाणे राहील :

साधारण सभासद वर्षाला १५ रुपये

आजीव सभासद २०० रुपये

देणगीदार सभासद ५०० रुपये

आश्रयदाता सभासद १००० रुपये

परिषदेच्या त्रैमासिक पत्रिकेची वार्षिक वर्गणी १५ रुपये साधारण सभासदांना

वेगळी द्यावी लागेल. ( कुटुंबात दोन सभासद आणि पत्रिकेची एक वर्गणी असल्यास या हिशोबाने १५ × २+१५=४५ रुपये वर्षाला भरावे लागतील. ) परिषदेची इतर प्रकाशने सर्व प्रकाराच्या सभासदांना ५०% सवलतीने मिळतील.

वर्गणी, देणगी, जाहिरातीसाठी आकार इत्यादी 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने पाठवावा. पुण्याबाहेरील चेकसाठी वटणावळ रुपये २ अधिक जोडावी.

संपर्काचा पत्ता : प्रभाकर नारायण परांजपे, १/८ आगरकरनगर, पुणे ४११००१ ( फोन २३४९६ ); वृत्तपत्र-विद्या-विभाग ( पुणे विद्यापीठ ), रानडे इन्स्टिटयूट इमारत पुणे ४११००४ ( फोन ५४०६९ )

त्रैमासिकासाठी जाहिराती मिळवून देणे आणि परिषदेची प्रकाशने एक-गठ्ठा विकत घेववणे हाही परिषदेला साहाय्य करण्याचा मार्ग आहे. परिषदेला अर्थात मुख्य गरज आहे ती कल्पक आणि निरलस कार्यकर्त्यांची.

## परिषदेच्या विद्यमाने झालेले कार्यक्रम

आपल्या पहिल्या दीड वर्षाच्या अवधीत ( १ जानेवारी १९८२ ते ३० जून १९८३ ) परिषदेतर्फे पुढील कार्यक्रम व्याख्याने आणि चर्चा या स्वरूपाचे आयोजित झाले. सर्व कार्यक्रम पुणे येथे झाले. ( बाहेरगावी सभासदसंख्या जिथे मोठी वाढेल तिथे त्या सभासदांनी पुढाकार घेऊन कार्यक्रम आखावे अशी कल्पना आहे. अशा कार्यक्रमांची वार्ता संपादकांकडे अवश्य पाठवावी. )

१ जानेवारी ८२/ स्थापना, संस्थेच्या स्वरूपाबद्दल चर्चा, डॉ. अशोक रा. केळकर यांच्या 'मराठी विकास संस्था' या विषयावरील लेखाचे वाचन.

६ फेब्रुवारी ८२/ य. शं. कानिटकर यांचे 'भाषासंचालनालयाने मराठीसाठी काय केले ?' यावर व्याख्यान.

२२ मार्च ८२ / प्रा. प्रभाकर ऊर्ध्वरेषे यांचे 'त्रिभाषासूत्राचे मूल्यमापन' यावर व्याख्यान.

३० एप्रिल ८२ / प्रा. ल. ना. गोखले यांचे 'वृत्तपत्रातील मराठी' यावर व्याख्यान.

१७ मे ८२ / डॉ. चित्रा नाईक यांचे 'प्रौढ व अनौपचारिक शिक्षणात मराठीचे अध्यापन' यावर व्याख्यान. ( सोबत इंडियन इन्स्टिटयूट ऑफ एज्युकेशन, पुणे या संस्थेतर्फे प्रौढ व अनौपचारिक शिक्षणासाठी तयार केलेल्या पुस्तिकांचे प्रदर्शन भरवण्यात आले होते. )

२० मे ८२ / डॉ. रा. सो. सराफ यांचे 'पाठ्यपुस्तकमंडळ आणि मराठीचे अध्ययन' यावर व्याख्यान. ( सोबत पाठ्यपुस्तक मंडळाने तयार केलेल्या मराठी पाठ्यपुस्तकांचे प्रदर्शन भरवण्यात आले होते )

१४ जुलै ८२ / मराठी-साहित्य-परिषदेच्या सहकार्याने प्रा. गं. बा. सरदार

यांच्या अध्यक्षतेखाली 'महाराष्ट्रात मराठीसाठी गोकाक अहवाल हवा?' यावर परिसंवाद झाला. त्यात प्रा. प्रभाकर नारायण परांजपे यांनी गोकाक अहवालाबद्दल माहिती करून दिल्यानंतर डॉ. अशोक रा. केळकर, डॉ. सत्यरंजन साठे, डॉ. भालचंद्र फडके, व श्री. चंद्रकांत घोरपडे यांची भाषणे झाली. मराठीला शासन व्यवहारात आणि शिक्षणक्रमात योग्य ते स्थान मिळावे, भाषाविषयक प्रश्नांची चौकशी करण्यासाठी महाराष्ट्र सरकारने आयोग नेमावा, आणि मराठी–विकास–संस्थेची स्थापना सरकारने करावी या आशयाचे ठराव संमत होऊन दोन्ही परिषदांनी संयुक्तपणे शासनाकडे तसे पत्र पाठवले. पत्रकाच्या प्रती मराठी-अभ्यास-परिषदेने साहित्य संस्था आणि मराठीभाषी आमदार–खासदार यांच्याकडे पाठवल्या. बॅ. विठ्ठलराव गाडगीळ, प्रा. ग. प्र. प्रधान, आणि श्री. सदाशिव बागाईतकर यांच्याकडून आवश्यक त्या सहकार्याचे आश्वासन मिळाले.

१३–१४ सप्टेंबर ८२ / पुण्यातील प्राथमिक व माध्यमिक शाळांतील मराठी भाषाशिक्षकांसाठी विशेष कार्यक्रम म्हणून डॉ. व. सी. देशपांडे ('पाच वर्षे वयाच्या मुलांना वाचन शिकवणे'), डॉ. प्र. रं. नळदकर (मराठी शब्दसंपत्ती : इयता १ व २'), आणि डॉ. शकुंतला लाटकर ('सातवीच्या पाठ्यपुस्तकांतील शब्दसंग्रह') यांची व्याख्याने झाली. नंतरच्या चर्चेत शिक्षकांच्या अध्यापनविषयक अडचणींचा विचार झाला.

२५ डिसेंबर ८२/ डॉ. मॅक्सीन बर्न्सन व श्रीमती जाई निंबकर यांनी लिहिलेल्या 'मराठी स्ट्रक्चरल पॅटर्न्ज' या पुस्तकाचे प्रकाशन झाले.

२३ फेब्रुअरी ८३/ युवामंच, पुणे यांच्या सहकार्याने डॉ. अशोक रा. केळकर यांच्या अध्यक्षतेखाली 'मराठी माध्यम का इंग्रजी माध्यम?' यावर परिसंवाद झाला. डॉ. अंजली सोमण यांच्या प्रास्ताविकानंतर डॉ. मॅक्सीन बर्न्सन, प्रभाकर ऊर्ध्वरेषे, प्रा. स. शि. भावे यांची भाषणे झाली. नंतर खुली चर्चा होऊन अध्यक्षांनी चर्चेचा समारोप केला. विद्यार्थीवर्गाची उपस्थिती बऱ्याच मोठ्या संख्येने होती.

१ मे ८३ / महाराष्ट्र-दिन हा मराठी-विकास-दिन म्हणूनही पाळावा असे आवाहन परिषदेने केले होते. 'मराठीचे बलसंवर्धन कसे होईल?' यावर परिषदेने एक चर्चासत्र योजले आणि डॉ. अशोक रा. केळकर यांच्या 'वैखरी : भाषा आणि भाषा-व्यवहार' (मुंबई : मॅजेस्टिक बुक स्टॉल, १९८३) या पुस्तकाच्या अनुरोधाने चर्चा घडवून आणली. डॉ. वसंतराव पटवर्धन यांनी उद्घाटन केले. नंतर प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या अध्यक्षतेखाली डॉ. रमेश धोंगडे (भारतीय शिक्षणपद्धतीतील मराठीचे स्थान'), डॉ. श्रीरंग संगोराम ('हिंदीचे स्थान'), प्रा. मिलिंद मालशे (इंग्रजीचे स्थान'), यांनी निबंध वाचले व निमंत्रितांची चर्चा झाली. प्रा. मे. पुं. रेगे यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या दुसऱ्या सत्रात डॉ. न. ब. पाटील ('मराठीचा विकास व शासन'), प्रा. प्र. ना. परांजपे ('मराठीचा विकास. काय करायला हवे?'), डॉ. गं. ना. जोगळेकर ('मराठीचा विकास : आजची स्थिती') यांनी निबंध वाचले





अनुक्रमणिका

व निमन्त्रितांची चर्चा झाली. समारोपसत्रात डॉ. केळकरांनी चर्चेला उत्तर दिले व श्री. श्री. ग. मुणगेकर यांनी समारोप केला. चर्चासत्र संपल्यावर परिषदेचे सभासद व हितचिंतक यांचा मेळावा होऊन उपयुक्त चर्चा झाली. मराठी–अभ्यास–परिषद् आणि बँक ऑव्ह महाराष्ट्र यांच्यातर्फे द्यावयाच्या महाबँक भाषाविषयक-लेखन-पारितोषिकाची योजना उद्घाटनसत्राच्या वेळी घोषित करण्यात आली. या सर्व चर्चासत्राचा वृत्तांत आणि त्यामध्ये वाचले गेलेले पाच निबंध 'महाराष्ट्र मराठी अध्यापक' त्रैमासिकाच्या जून १९७३ च्या अंकात प्रकाशित झाले आहेत. महाराष्ट्र मराठी माध्यमिक शिक्षण संघाचे कार्यकर्ते व त्रैमासिकाचे संपादक श्री. वासू देशपांडे यांचे उत्स्फूर्त सहकार्य या रूपाने परिषदेला मिळाले आहे. या अंकाच्या प्रती परिषदेच्या सभासदांना भेट म्हणून देण्यात आल्या आहेत.

## ग्रंथप्रकाशनाची योजना

ग्रंथाली, मुंबई या संस्थेच्या सहकार्याने परिषदेला १९८२–८३ मध्ये अमराठी विद्यार्थ्यांना इंग्रजीच्या माध्यमातून मराठी शिकता यावे यासाठी एका ग्रंथमालेचा उपक्रम हाती घेता आला. डॉ. मॅक्सीन बर्न्सन आणि श्रीमती जाई निंबकर यांनी ही पुस्तके तयार केली आहेत. आतापर्यंत बाहेर पडलेली पुस्तके म्हणजे—

मराठी स्ट्रक्चरल पॅटर्न्ज : बुक वन, १९८२, रु. १५०.

मराठी कॉन्व्हर्सेशनल सिच्युएशन्ज, १९८३, रु. ९०.

मराठी रीडिंग्ज, १९८३, रु. ५०.

मराठी व्होकॅब्यूलरी मॅन्युअल. १९८३, रु. ७५

मराठी इलस्ट्रेटिड व्होकॅब्यूलरी, १९८३, रु. ३५

क्राउन चतुष्पत्री ( ९॥ × ७॥ इंच ) आकाराची एकूण ९४० पृष्ठे होतात व संचाची किंमत रु. ४०० होते.

महाराष्ट्र बँकेने आपल्या अमराठी सेवकांसाठी १०० संच विकत घेतले. परिषद् आणि ग्रंथाली यांच्या सभासदांना हा संच ५० टक्के सवलतीने म्हणजे २०५ रुपयांत मिळू शकेल.

## महाराष्ट्राच्या शिक्षणमंत्र्यांना निवेदन

दिनांक २४ एप्रिल १९८३ पुणे मुक्कामी महाराष्ट्राचे शिक्षणमंत्री श्री. सुधाकर नाईक यांची परिषदेतर्फे डॉ. अशोक रा. केळकर, प्रा. प्र. ना. परांजपे, डॉ. अंजली सोमण, आणि श्री. य. शं. कानिटकर या कार्यकर्त्यांनी भेट घेतली. परिषदेच्या उद्दिष्टांबद्दल आणि आतापर्यंतच्या व संकल्पित कार्याबद्दल मंत्र्यानी माहिती करून घेतली आणि महाराष्ट्र सरकारने मराठी भाषीयांच्या व मराठी भाषेच्या गरजा पुऱ्या

व्हाव्या यासाठी काय करावे या संबंधात एक निवेदन त्यांना परिषदेतर्फे सादर करण्यात आले. निवेदनातील ठळक बाबी म्हणजे—

( १ ) 'मराठी–विकास–संस्था' ही योजना १९७९ साली महाराष्ट्र सरकारला सादर करण्यात आली होती, ती सरकारने मार्गी लावावी व अशी संस्था स्थापन करावी.

( २ ) मराठी अभ्यास परिषदेच्या ग्रंथप्रकाशन, नियतकालिकप्रकाशन इत्यादी कार्यांना शासनाने विविध रूपाने मदत करावी.

( ३ ) महाराष्ट्राचे नागरिक, विशेषतः मराठी–भाषीय, यांच्या भाषिक गरजा नेमक्या काय आहेत याचा आणि शिक्षणात मराठी भाषेचे विषय म्हणून आणि माध्यम म्हणून काय स्थान असावे याचा व्यापक पातळीवर विचार करण्यासाठी महाराष्ट्र शासनाने एक भाषा-आयोग स्थापावा.

श्री. नाईक यांनी निवेदन स्वीकारून त्याचा विचार करण्याचे आश्वासन दिले.

## महाबँक भाषाविषयक-लेखन–पारितोषिकाची योजना

परिषदेच्या उद्दिष्टांच्या पूर्तीसाठी उपयुक्त अशा ग्रंथांचे लेखन आणि प्रकाशन यांना भरीव उत्तेजन मिळावे म्हणून महाराष्ट्र बँकेच्या सहकार्याने एका ग्रंथपारितोषिकाची योजना परिषदेने हाती घेतलेली आहे. यासाठी जरूर ती रक्कम बँकेने उपलब्ध करायची आणि परिषदेने योजना प्रत्यक्ष राबविण्यासाठी परीक्षकमंडळ नेमण्याची व इतर सर्व प्रकारची तरतूद करायची अशी कल्पना आहे.

पारितोषिक रुपये एक हजारचे राहील. १९८३ चे पारितोषिक १९८१–१९८२ या अवधीमधील भाषाविषयक लेखनासाठी दिले जाईल. पारितोषिकासाठी केलेली नियमावली रु. २ पाठवून परिषदेच्या चिटणिसांकडून मागवून घेता येईल.

१९८३ च्या परीक्षकमंडळाने काम सुरू केले आहे.

## परिषदेच्या सभासदांची यादी

या ठिकाणी फक्त आजीव, देणगीदार, आणि आश्रयदाता सभासदांची ३१ जुलै १९८३ अखेरची यादी देण्यात आली आहे.

( १ ) प्रा. प्रभाकर नारायण परांजपे, पुणे
( २ ) डॉ. अंजली सोमण, पुणे
( ३ ) श्री. यशवंत शंकर कानिटकर, पुणे
( ४ ) श्री. ना. म. केतकर, पुणे
( ५ ) प्रा. मिलिंद मालशे, मुंबई
( ६ ) श्री. राजाभाऊ माटे, पुणे





अनुक्रमणिका

( ७ ) प्रा. स. शि. भावे, पुणे
( ८ ) श्रीमती जाई निंबकर, फलटण
( ९ ) श्री. मधुकर टिकेकर, पुणे
( १० ) श्रीमती पद्मजा जोशी, पुणे
( ११ ) प्रा. ल. ना. गोखले, पुणे
( १२ ) प्रा. रा. भि. जोशी, मुंबई
( १३ ) श्री. अरविंद कोल्हटकर, मुंबई
( १४ ) श्री. विलास एकबोटे, पुणे
( १५ ) डॉ. मॅक्सीन बर्न्सन, फलटण
( १६ ) डॉ. सुभाष पत्की, पुणे ( देणगीदार )
( १७ ) सौ. वीणा मधुकर गानू, हैदराबाद ( आश्रयदाता )
( १८ ) प्रा. श्री. पु. भागवत, मुंबई
( १९ ) प्रा. ग. प्र. प्रधान, पुणे
( २० ) प्रा. सुमन बेलवलकर, पुणे
( २१ ) प्रा. यास्मिन शेख, मुंबई
( २२ ) डॉ. अशोक रा. केळकर, पुणे
( २३ ) प्रा. विजया देव, मुंबई
( २४ ) श्रीमती विमला रथ, पुणे
( २५ ) श्री. श्यामविमल शर्मा, नवी दिल्ली
( २६ ) डॉ. ॲन फेल्डहाउस, टेंपी, ॲरिझोना, यु. स्टे.
( २७ ) श्री. पु. कृ. गर्दे, पुणे ( आश्रयदाता )
( २८ ) डॉ. इंदिरा जुनघरे, मिनिॲपोलिस, मिनिसोटा, यु. स्टे.
( २९ ) श्री. ग. बा. दामले, गुहागर
( ३० ) श्री. प. धों. कुंटे, पुणे ( आश्रयदाता )

यांच्याखेरीज परिषदेला अनेक साधारण सभासद मिळाले आहेत.

ज्यांनी १९८३ ची वर्गणी अजून भरलेली नाही त्यांनी शक्य तितक्या लवकर ती भरावी. त्याचप्रमाणे सभासदांनी नवीन सभासदही मिळवून द्यावेत अशी विनंती आहे.

## आपण मराठी-अभ्यास-परिषदेसाठी काय करणार ?

— सभासद नसलात तर प्रथम स्वतः सभासद व्हा.

— सभासद असलात तर देणगीदार / आश्रयदाते सभासद आणि साधारण / आजीव सभासद मिळवून द्या.

— परिषदेसाठी काही नियमित वेळ देऊ शकत असाल तर चिटणिसांशी संपर्क साधा. परिषदेचे सर्व कार्यकर्ते आपले नित्याचे काम संभाळून परिषदेची कामे करीत असल्यामुळे एकाच्या जागी चार कार्यकर्ते लागतात.

— परिषदेने प्रकाशित केलेल्या पुस्तकांच्या विक्रीसाठी साहाय्य करा.

— परिषदेचे काम वाढवण्यासाठी नवनव्या कल्पना सुचवा.

## आपण पत्रिकेसाठी काय करू शकता ?

— लेखन पाठवा.

— परभाषांतून अनुवाद करा.

— ग्रंथ परीक्षणे लिहा.

— ' पुनर्भेट ' किंवा ' वाघिणीचे दूध ' या सदरास योग्य अशा मराठी किंवा अन्य भाषेतील मजकुराद्दल सूचना पाठवा.

— भाषेसंबंधी वार्ता, भाषादोषांची उदाहरणे, चांगल्या भाषेची उदाहरणे इत्यादींशी संबंधित वृत्तपत्रीय किंवा इतर कात्रणे पाठवा.

—पत्रिकेत भाषाव्यवहाराशी संबंधित हास्यचित्रे द्यायची कल्पना कशी वाटते ?

— जाहिराती मिळवून द्या.

— संस्था–वर्गणीदार मिळवून द्या.

या अंकाची किंमत १० रुपये

---

संपादक : अशोक रा. केळकर, मुद्रक : चिं. स. लाटकर, कल्पना मुद्रणालय, पुणे ४११०३०. प्रकाशक : प्र. ना. परांजपे, मराठी-अभ्यास-परिषद्, १/८ आगरकरनगर, पुणे ४११००१.



अनुक्रमणिका